॥ब्रह्मण्याधायकर्माणिसंगंत्यक्त्वाकरोतियः॥लिप्यतेनसपापेनपद्मप त्रमिवांभसा॥१०॥ ॥सम॰॥ ॥ब्रह्मींअर्पूनियांकर्मेसंगटाकूनिजोकरी॥ पापेनलिंपेतोजैसेंजळींकमळिणीदळ॥१०॥ ॥आर्या॥ ॥ब्रह्मींअर्पुनिक र्मेंकरिजोहोउनिअलिप्तसंगमळीं॥पापेंलिप्तनसेतोकमळदळजसेंनलिप्तहोय जळीं॥१०॥ ॥दोहरा॥ ॥करमकरेतजिसंगकोंसबकोंब्रह्मज्यान॥ता- कोंपापनहिलगतहेपद्मपत्रजउमान॥१०॥ ॥ओवी॥ ॥ब्रह्मार्पणकर्मक री॥संगत्यजूनिअसेनिर्धारी॥पापेनलिंपेऐसियापरी॥पद्मपत्रउदकींजैसें॥१० ॥ ॥अभंग॥ ॥कर्मेंब्रह्मींअर्पून॥जालेंमानसउन्मन॥१॥करीसांडुनियां संगु॥निरपेक्षतोचिचांगु॥२॥पापेंनलिंपेतोजैसे॥स्फटिकरंगाचेकडवसे॥३॥ जळींपत्रकमळिणीचें॥तुकयासिसाम्यत्याचे॥४॥१०॥ ॥श्लोक॥ ॥का येनमनसाबुध्याकेवलैरिंद्रियैरपि॥योगिनःकर्मकुर्वंतिसंगंत्यक्त्वात्मशु द्धये॥११॥ ॥सम॰॥ ॥कायामनेंबुद्धिनेंहीवासनातीतइंद्रियें॥चित्तशु द्ध्यर्थकरितीसंगटाकूनियांक्रिया॥११॥ ॥आर्या॥ ॥देहमनबुद्धियांहींयो

गीगतवासनेंद्रियासहित॥ निजचित्तशुद्धिसाठींसंगत्यागूनियांक्रियाकरित॥
११॥ ॥दोहरा॥ ॥देहबुद्धिमनइंद्रियनजोगीहुयेनिःसंग॥करमकरत
अतिचाहसोचित्तसोचकढंग॥११॥ ॥ओवी॥ ॥कर्मफळाचीइच्छात्यजु
नी॥शांतिनिष्ठापावेमनीं॥कायामनेंयुक्तआचरोनी॥फळटाकूनिकर्मकरी
॥११॥ ॥अभंग॥ ॥कायामानसयेकाय॥बुद्धीहोऊंनेदीउग्र॥१॥गेली
वासनापळाली॥करणेंयेकापंथींआलीं॥२॥मगवांछीचित्तशुद्धि॥करीनिःसं
गत्वसिद्धि॥३॥संगटाकुनियांक्रिया॥स्वात्मप्राप्तिहेतुकया॥४॥११॥ ॥
श्लोक॥ ॥युक्तःकर्मफलंत्यक्त्वाशांतिमाप्नोतिनैष्ठिकीम्॥अयुक्तः
कामकारेणफलेसक्तोनिबध्यते॥१२॥ ॥सम०॥ ॥योगीकर्मफलत्यागें
स्थितीचीशांतिपावतो॥सकामकामसंकल्पें बद्धहोतोफळींरत॥१२॥ ॥आ
र्या॥ ॥त्यागुनिकर्मफळातें पावेतोमुक्तनैष्ठिकीशांती॥कामेंअयुक्तबंधाक
र्मफळासक्तपावतोअंतीं॥१२॥ ॥दोहरा॥ ॥ग्यानीकुसुगतीलहेकरमक
रेफलछांड॥मूरखफलकीआसकरेबंधकामनाआड॥१२॥ ॥ओवी॥

ज्ञानीमुक्ति तें पावती ॥ कर्म करूनि फलेच्छा टाकिती ॥ कामनाबंधें पडती ॥ ते बद्ध होत ॥ १२ ॥ ॥ अभंग ॥ ॥ योगी ऐशा चिन्हीं जाण ॥ कर्म फळीं निराकरण ॥ १ ॥ आत्मस्थितीस पावला ॥ सहज शांती आली त्याला ॥ २ ॥ सकामता लागे पाप ॥ जेथें कामना संकल्प ॥ ३ ॥ बद्ध फलाशें बाधतो ॥ तुका ह्मणे वायां जातो ॥ ४ ॥ १२ ॥ ॥ सर्वकर्माणि मनसा संन्यस्यास्ते सुखं वशी ॥ नवद्वारे पुरे देही नैव कुर्वन्न कारयन् ॥ १३ ॥ ॥ सम० ॥ ॥ करूनि कर्मे संन्यासी मने होऊनियां सुखें ॥ असे नवद्वारपुरीं कांहीं न करवी करी ॥ १३ ॥ ॥ आर्या ॥ करूनि कर्में हि मनें संन्यासी होउनी असे स्वसुखें ॥ देह नवद्वारपुरीं कांहीं न करी स्वयें न करवि सुखें ॥ १३ ॥ ॥ दोहरा ॥ ॥ मन करी करम जे तजत ग्यानी तिन को मान ॥ नवद्वारपुरमें बसत लेत सुख की खान ॥ १३ ॥ ॥ ओवी ॥ ॥ मनें करूनि कर्में जो त्यजी ॥ ज्ञानी त्यास ह्मणिजे जी ॥ देहीं नवद्वारपुरीं जी ॥ न करी करवी ॥ १३ ॥ ॥ अभंग ॥ ॥ करुनी निष्कामें कर्मास ॥ योगी संपादी संन्यास ॥ १ ॥ सुखी होउनीयां मनें ॥ न करी क्षुद्रादि साधनें ॥ २ ॥ नवद्वारें पुरे देहीं ॥ च

स्तीसंरक्षीविदेही ॥ ३ ॥ स्वयेंनकरीकरवीहिना ॥ तुकाह्मणेइतरजना ॥ ४ ॥ १३
श्लोक ॥ ॥ नकर्त्तृत्वंनकर्माणिलोकस्यसृजतिप्रभुः ॥ नकर्मफलसंयो
गंस्वभावस्तुप्रवर्तते ॥ १४ ॥ ॥ सम० ॥ ॥ कर्त्तृत्वकर्मेंलोकांचींनईश्वर
हीनिर्मितो ॥ नकर्मफलभोगातेंवर्त्तेसंसारचक्रहें ॥ १४ ॥ ॥ आर्या ॥ ॥ क
र्तृत्वकर्मयातेंलोकाचेंनिर्मितोनईश्वरतें ॥ तेंविनकर्मफळाच्याभोगासंस्कारच
क्रहेंवर्त्ते ॥ १४ ॥ ॥ दोहरा ॥ ॥ ईश्वरकरमनकरतनहिकरमकरतार ॥ क
रमफलनहिकरतप्रकृतिकरीविस्तार ॥ १४ ॥ ॥ ओवी ॥ ॥ ईश्वरना
हींकर्मकरित ॥ कर्तृत्वयालोकांत ॥ नकर्मफलभोगातें ॥ संसारचक्रअसे
१४ ॥ ॥ अभंग ॥ ॥ कर्तृत्वकर्मलोकाचें ॥ अथवात्याच्याप्रपंचाचे ॥ १ ॥
ईश्वरनिर्मुनीनिराळा ॥ कर्मसाक्षित्वेंवेगळा ॥ २ ॥ नतोकर्मासकरवी ॥ अथवा
फळश्रुतीभोगवी ॥ ३ ॥ वर्तेसंसाराचेंचक्र ॥ तुकासर्वदाअवक्र ॥ ४ ॥ १४ ॥
श्लोक ॥ ॥ नादत्तेकस्यचित्पापंनचैवसुकृतंविभुः ॥ अज्ञानेनावृतं
ज्ञानंतेनमुह्यंतिजंतवः ॥ १५ ॥ ॥ सम० ॥ ॥ कोणाचेंपापहिनेघेने

घे पुण्यहि ईश्वर ॥ अज्ञानें वेष्टिलें ज्ञान कोणें करिति भोगिती ॥ १५ ॥ ॥ आर्या ॥ ॥ कोणाचें अघ ने घे ने घे पुण्यास हीविभू परतू ॥ अज्ञान ज्ञानातें अवशी तेणेंचि मोहतीजंतू ॥ १५ ॥ ॥ दोहरा ॥ ॥ सुकृति न कांहु कों गहे ओरपाप नहि लेत ॥ छायो ग्यान अग्यान नें मोह न प्रगट न देत ॥ १५ ॥ ॥ ओवी ॥ ॥ कोणाचें पाप न घे जाण ॥ पुण्याचे न लगे कारण ॥ अज्ञानें वेष्टिलें जन ॥ त्याणें भोग भोगिती ॥ १५ ॥ अभंग ॥ ॥ पाप हि ने घे तो कोणाचें ॥ जेणें योगें पुरदुःखाचें ॥ १ ॥ ने घे पुण्य ही ईश्वर ॥ पावावयास्वर्गद्वार ॥ २ ॥ अज्ञानाचें जें वेष्टित ॥ ज्ञान मोहें विस्कळित ॥ ३ यास्तव करिती भोगिती ॥ तुकाह्मणे अहंमती ॥ ४ ॥ ॥ श्लोक ॥ ॥ ज्ञानेन तु तदज्ञानं येषां नाशितमात्मनः ॥ तेषामादित्यवज्ज्ञानं प्रकाशयति तत्परम् ॥ १६ ॥ ॥ सम॰ ॥ ॥ अज्ञान बुद्धिचें जांचें तें ज्या ज्ञानेंचि नाशिलें ॥ पराजडातें तें त्यांचें प्रकाशी ज्ञान सूर्यवत् ॥ १६ ॥ ॥ आर्या ॥ ॥ आत्मज्ञानें ज्यांचें अज्ञान समूळ पावलें नाश ॥ सूर्यापरि दावी तें ज्ञान प्रगटोनि आत्मरूपास ॥ १६ ॥ ॥ दोहरा ॥ ॥ दूरे कियो अग्यान जिन हियें ग्या

नप्रगटाय ॥ देखत ईश्वररूप तें ग्यानि सूरके दाय॥१६॥ ॥ओवी॥ ॥अज्ञा
न गेलियावरी ॥ ज्ञान प्रगटवी अंतरीं॥ तो ईश्वररूप निर्धारी॥ ज्ञानवंत जाणतं
॥ ॥अभंग॥ ॥अज्ञान निज बुद्धिचें॥ नासि ज्ञान जिव्हाळ्याचें॥ परिज्ञा
न शुद्ध चोखट॥ नाशि अज्ञानाचें दुःख॥२॥ परा जडाचे तें ज्यांचे॥ अंधने त्रति
मिराचे॥३॥ ज्ञानसूर्य उदयांत॥ तुका जाला स्वरूपवंत॥४॥ १६॥ ॥श्लोक
॥ तद्बुद्धयस्तदात्मानस्तन्निष्ठास्तत्परायणाः॥ गच्छंत्यपुनरावृत्तिं-
ज्ञाननिर्धूतकल्मषाः॥ १७॥ ॥सम०॥ त्याचि ज्ञानीं बुद्धि चित्त निष्ठा तें प
रमाश्रय॥ असे ते पावती मोक्ष ज्ञानें जाळूनि संचित॥१७॥ ॥आर्या॥
तन्निष्ठ तत्परायण अर्पुनि मन बुद्धि ईश्वरीं सारी ॥ न पवति पुनरावृत्ति ज्ञानें नाशोनि
कल्मषें भारी॥१७॥ ॥ ॥दोहरा॥ ॥ जो मनकों ओर बुद्धिकों रोखत ईश्वर
माह ॥ जनम मरणा तिनकों नहिं मुगत होत नर नाह॥१७॥ ॥ओवी॥ ॥
जें मन आणि बुद्धी तें॥ ईश्वरस्थापनें निश्चितें॥ भय नाहीं तयातें॥ मुक्त हो
य॥१७॥ ॥अभंग॥ ॥ बुद्धि चित्त त्याचि ज्ञानीं॥ येक विधनियमुनि

॥१॥ परमाश्रयें तेंचि निष्ठा ॥ साजे सदा योगभ्रष्टा ॥२॥ मोक्ष पावति ऐसे ते ॥ विश्वंभ रींये कचित्तें ॥३॥ तुकाह्मणे दग्ध केलें ॥ ज्ञानें संचित्त जाळिलें ॥४॥ १७॥ ॥श्लो क॥ ॥विद्याविनयसंपन्ने ब्राह्मणे गवि हस्तिनि ॥ शुनि चैव श्वपाके च पं डिताः समदर्शिनः ॥१८॥ ॥सम०॥ ॥विद्यासद्गुणसंपन्नीं ब्राह्मणीं धेनुहीम धें ॥ जगीं श्वानां तचांडाळीं पाहती सम पंडित ॥१८॥ ॥आर्या॥ ॥विद्याविनयी ब्राह्मण गाय श्वपच गज आणि तीं श्वानें ॥ पाहति समदृष्टी जे पंडित ते वंदिजे त विश्वा नें ॥१८॥ ॥दोहरा॥ ॥विद्याबिनयस्रूढ जे गो गज शूकर श्वान ॥ ग्यानीं इनकों गणत हैं भेद लेत नहिमान ॥१८॥ ॥ ओवी ॥ ॥विद्याविनयसंपन्न ॥ गाय ग ज शूकर श्वान ॥ हे ज यासि सम जाण ॥ तोचि ज्ञानी पंडित ॥१८॥ ॥अभंग॥ ॥ विद्यासद्गुणसंपन्न ॥ अयाचित लोकमान्य ॥१॥ ब्राह्मणीं धेनुमध्यें ॥ याति भेदादि सं बंधें ॥२॥ जगीं श्वुनीं ते चांडाळीं ॥ सम पंडित न्याहाळी ॥३॥ ज्ञान ज्यांचें अखंडित ॥ तु काह्मणे तो पंडित ॥४॥ १८॥ ॥श्लोक॥ ॥इहैव तैर्जितः सर्गो येषां साम्ये स्थितं मनः ॥ निर्दोषं हि समं ब्रह्म तस्माद्ब्रह्मणि ते स्थिताः ॥१९॥ ॥सम०॥

समींमनस्थिरतिहीं जितांच भवजिंकिला॥ समतें ब्रह्म निर्दोष तस्माद्ब्रह्मीं चतेंसमी
॥१९॥ ॥आर्या॥ ॥स्थिरमनसमींजयांचेंजितांचिभवजिंकिलातिहींपार्था
समतेंब्रह्मएकनिर्मळतस्माद्ब्रह्मींचतेसमीसमता॥१९॥ दोहरा॥ ॥समताजिनके
जीवमेतिनजित्योसंङूसार॥समब्रह्महिकोंकहतब्रह्मलिहिननिरधार॥१९॥ ॥
ओवी॥ ॥समज्याचेजिवीवसे॥त्याहींसंसारजिंकिलासे॥निर्दोषहीवसतसे॥
ब्रह्मींतोसम॥१९॥ ॥अभंग॥ ॥सर्वभूतींमनआपुलें॥जेणेंसमानस्थापिलें॥
तेणेंजीतअसतांवीरा॥केलामानेराभवाचा॥२॥समब्रह्मतेंनिर्दोष॥जेंनिःशेषनिर्म
ळ॥३॥ तस्माद्ब्रह्मींनतेसमी॥तुकयावर्मींमनरातें॥४॥१९॥ ॥श्लोक॥ ॥
नप्रहृष्येत्प्रियंप्राप्यनोद्विजेत्प्राप्यचाप्रियम्॥स्थिरबुद्धिरसंमूढोब्रह्मवि
द्ब्रह्मणिस्थितः॥२०॥ ॥सम०॥ ॥नहर्षेप्रियहोतांजोअप्रियेंघाबरानव्हे॥स्थि
रबुद्धिनजोमूढब्रह्मींब्रह्मज्ञजोस्थिर॥२०॥ ॥आर्या॥ ॥प्रियहोतांहर्षेनाअ
प्रियहोतांचिदुःखजोसाहे॥स्थिरबुद्धिनजोमूढब्रह्मींब्रह्मज्ञपांडवाराहे॥२०॥ ॥
दोहरा॥ ॥सुखपायेहरखेनहिंदुखपायेनरिसाय॥राखेथिरनिजबुद्धिकोंब्रह्मींर

गी·

हतसमाय॥ २०॥ ॥ ओवी॥ ॥ सुख झालिया हर्ष नाहीं ॥ दुःखजालियाक्रोधना
हीं॥ बुद्धीकरूनिस्थिरतेही॥ तेब्रह्मींपावती॥ २०॥ ॥ अभंग॥ ॥ नहर्षेप्रियहोतां
ना॥ ज्याच्यामनानिश्चळता॥ १॥ नोहे घाबराअप्रियें॥ ज्ञानरायज्ञान्याचा॥ २॥ नजोमू
ढस्थिरबुद्धि॥ देहशुद्धीरहित॥ ३॥ ब्रह्मींस्थिरब्रह्मवेत्ता॥ तुकयाचित्तामिळाला॥ ४॥
२०॥ ॥ श्लोक॥ ॥ बाह्यस्पर्शेष्वसक्तात्मा विंदत्यात्मनि यत्सुखम्॥ सब्रह्म
योगयुक्तात्मा सुखमक्षय्यमश्नुते॥ २१॥ ॥ सम०॥ ॥ स्पृहा न बाह्यविषयींस्व
रूपींपावतोसुख॥ ब्रह्मयोगींयुक्तचित्त तो भोगीसुखअक्षय॥ २१॥ ॥ आर्या॥
बाह्यस्पर्शत्यागीपावेअंतःसुखासिजोयोगी॥ तोब्रह्मयोगयुक्त ज्ञानी अक्षय्य पूर्णसु
खभोगी॥ २१॥ ॥ दोहरा॥ ॥ बाहरकेंसुखकोंतजेहियसुखरहेसुजान॥ ब्रह्म
सुखकोंधरतलहेजु आनंदमान॥ २१॥ ॥ ओवी॥ ॥ बाह्यसुखातेंत्यजी॥ हृदयीं
आत्मसुखजाणोनजी॥ ब्रह्मसुखनिरंतरजी॥ अक्षय्यसुखभोगी॥ २१॥ ॥ अभंग
॥ ॥ स्पृहा न बाह्यविषयीं॥ येकेठायींयेकला॥ १॥ सुख पावतांस्वरूपीं॥ सहजपापी
त्यागिला॥ २॥ युक्तचित्तब्रह्मयोगी॥ सुखाभोगीअक्षया॥ ३॥ तुकाह्मणेयापरतें॥

अ
५

कायउरतेंबोलाया ॥ ४॥ २१॥ श्लोक ॥ ॥ येहिसंस्पर्शजाभोगादुःखयोनय
९ एवते ॥आद्यंतवंतःकौंतेयनतेषुरमतेबुधः॥ २२॥ ॥सम०॥ ॥ जेंभोगविष
यस्पर्शे तेंदुःखाचेंचिकारण ॥ आद्यंतवंतकौंते यारमे ज्ञानीनत्यासुखी ॥ २२॥ ॥आ
र्या॥ ॥ जेविषयभोगपार्थातेदुःखाचेप्रतिक्षणींदाते ॥ उत्पत्तिनाशिवंत स्ववशें रमवि
तिबुधासिनकदाते ॥ २२॥ ॥ दोहरा ॥ ॥ बिखेजितेंसंड्सार केंतेंहेदुःखकोंमू
ल ॥उपजतबिनसतहेतिन्हें पंडतगयेनभूल ॥ २२॥ ॥ ओवी ॥ ॥ स्पर्शें
संसारगरलसार ॥ तेंदुःखाचेंमूळनिरंतर ॥ नाशहोतअपार ॥ कौंतेयाज्ञानीखी ॥
२२॥ ॥अभंग॥ ॥ जोकांस्पर्शेंभोगविषय॥ मोहोबाह्यधरुनी ॥ १ ॥ तेंतवक
रणदुःखाचें ॥जेथेंवेचेआयुष्य ॥ २॥ आद्यंतवंतपार्था ॥ हेअवस्थाभूमीची ॥ ३॥ रमे
ज्ञानींनत्यासुखी ॥ तुकादुःखीप्रपंचीं ॥ ४॥ ॥२२॥ ॥ श्लोक ॥ ॥ शक्नोती
हैवयःसोढुंप्राक्शरीरविमोक्षणात् ॥ कामक्रोधोद्भवंवेगंसयुक्तःससुखीन
र:॥ २३॥ ॥सम०॥ ॥ जोजितांचशकेसोसूंपूर्वींचमरणपाहुनी ॥ कामक्रोधादिवे ९
गातेंतोयोगीतोसुखीनर ॥ २३॥ ॥ आर्या ॥ ॥ निजमरणाहुनिपूर्वींकामक्रो

धादिवेगजोसाहे॥ तोयोगीतोचिसुखीतो ज्ञानी योग्यमुक्तिलालाहे॥२३॥ ॥दो
हरा॥ ॥ कामक्रोधकेबेगकोंजोसाहिसकेसुभाय॥ सोजोगीनितहिरहोतासुख
मेलपटाय॥२३॥ ॥ओवी॥ ॥योगियातेंहायोग॥कामक्रोधाचावेग॥साहूं
सकेसांग॥ तोयोगीसुखीअसे॥१॥ ॥अभंग॥ ॥ जोजिताचिअर्जुना॥ सो
सूंभावनाशकेल॥१॥ पूर्वींचमरणाहुनी॥ न्याहाळुनी उपेक्षी॥२॥ कामवेगक्रो
धोद्भव॥ स्वानुभवरक्षकु॥३॥ नरतोसुखीतोचियोगी॥ पांडुरंगींतुकयातो॥४॥
२३॥ ॥श्लोक॥ ॥ योंऽतःसुखोंऽतरारामस्तथांऽतर्ज्योतिरेवयः॥सयो-
गीब्रह्मनिर्वाणंब्रह्मभूतोऽधिगच्छति॥२४॥ ॥सम॰॥ ॥सुखीआंत
रमेआंतअंतर्ज्योतिचजो स्वयें॥जालाब्रह्मचितोयोगीब्रह्मनिर्वाणपावतो॥२४
॥ ॥आर्या॥ ॥अंतःप्रकाशमयजोअंतःसुखयुक्तअंतराराम॥ तोब्रह्मयुक्त
योगीपावेनिर्वाणपांडवाब्रह्म॥२४॥ ॥दोहरा॥ ॥जाकेहियेप्रकासहेअंतरसु
खआराम॥ वहेजोगीपरब्रह्मलहेब्रह्मकोंधाम॥२४॥ ॥ओवी॥ ॥ज्याचेंहृ
दयप्रकाशे॥अंतरसुखआरामभासे॥ तोचियोगीअसे॥ब्रह्मींनिर्वाणपावतो॥२४

॥ ॥ अभंग ॥ ॥ अंतरसुखीं अंतरीं रमे ॥ उंचप्रेमें निर्मळु ॥ १ ॥ अंतर्ज्योतीत जो स्वतां ॥ निर्मुक्तता प्रपंचीं ॥ २ ॥ योगी ब्रह्म चि नो जाला ॥ संगत्या लाउणीव ॥ ३ ॥ पावे निर्वाणपदा ॥ तुकया सदा हरिरूपें ॥ ४ ॥ २४ ॥ ॥ श्लोक ॥ ॥ लभंते ब्रह्मनिर्वाणमृषयः क्षीणकल्मषाः ॥ छिन्नद्वैधा यतात्मानः सर्वभूतहिते रताः ॥ २५ ॥ ॥ सम० ॥ ॥ पावती ब्रह्मनिर्वाण जे ज्ञानी क्षीणपातक ॥ द्वैतनाशें स्थिरमती सर्वभूतहितीं रत ॥ २५ ॥ ॥ आर्या ॥ ॥ निर्वाणब्रह्मातें पावति ऋषिवर्य जाणनिष्पापा ॥ छिन्नद्वैत यतात्मा करणारे सर्वभूतहित बापा ॥ २५ ॥ ॥ दोहरा ॥ ॥ जे ग्यानीं पाप नजत होत ब्रह्म मे लीन ॥ बदनतिनके जियमे रहत सबुन सों दीन ॥ २५ ॥ ओवी ॥ ॥ प्राणी पाप टाकीत ॥ ब्रह्मीं जे लीन होत ॥ त्यांचें सुख त्यांचे हृदयांत ॥ सर्वभूतहितरत असे ॥ २५ ॥ ॥ अभंग ॥ ॥ लाभे ब्रह्मरूपता देहीं ॥ निःसंदेही आकल्प ॥ १ ॥ क्षीणपातक जे ज्ञानी ॥ जगीं वसुनी अलिप्त ॥ २ ॥ स्थिरमति नासे द्वैत ॥ यातायात नोळखे ॥ ३ ॥ सर्वभूतहितीं रत ॥ पाहाती संत तुकयासी ॥ ४ ॥ २५ श्लोक ॥ ॥ कामक्रोधवियुक्तानां यतीनां यतचेतसाम् ॥ अभितो ब्रह्म

निर्वाणंवर्ततेविदितात्मनाम् ॥२६॥ ॥सम०॥ ॥ जेकामक्रोधरहितप्रयत्नींवश
चित्तजे॥देहवांचोमरोतेतोंमुक्तकेवळआत्मवित्॥२६॥ ॥आर्या॥ ॥कामक्रो
धत्यागीजेयतिवशचित्तसाधुजनमैत्र॥निर्वाणब्रह्मतयाविदितात्म्यालाअसेचिसर्व
त्र॥२६॥ ॥दोहरा॥ ॥कामक्रोधसोंजोरहितबस कीन्होनिजचीत॥ग्यानवं
ततेहैसदाब्रह्मचहुदिसमीत॥२६॥ ॥ओवी॥ ॥कामक्रोधविरहित॥आत्मा
जाणोनिवशकरित॥तोचिज्ञानवंतह्मणत ॥ब्रह्मात्मवित्॥२६॥ ॥अभंग॥
कामक्रोधाविरहित॥जालासंततोयेक॥१॥ जेणेप्रयत्नकेलाबहु॥मनवाहुकवळिला
॥२॥देहमगमरोवांचो॥अथवासाचोसंपत्ती॥३॥केवळमुक्तआत्मविद॥तुकयाप
दवंदितु॥४॥ २६॥ ॥श्लोक॥ ॥स्पर्शान्कृत्वाबहिर्बाह्यांश्चक्षुश्चैवांतरे
भ्रुवोः॥प्राणापानौसमौकृत्वानासाभ्यंतरचारिणौ॥२७॥ ॥सम०॥ ॥
बाहेरबाह्यविषयांदृष्टितेंभोंवयांमधें॥नासिकींवाहतीप्राणापानांतेंकरुनीसम॥२७
आर्या॥ ॥बाह्यस्पर्शत्यागेंभ्रूमध्यामाजिदृष्टिरोधोनी॥नासांतरसंचारीप्राणा
पानहिसमानसाधूनी॥२७॥ ॥दोहरा॥ ॥तजेबिखयसंङ्सारकेदृष्टिभोव

११

मेराख॥ प्राणअपानसमकरे नासतमत अभिलाख॥ २७॥ ॥ ओवी॥ ॥ बाह्य विषयसंसार॥त्यजोनिदृष्टिभोंवयावर॥ प्राणायामसमकर॥प्राणअपानसमकरूनिया॥२७॥ ॥अभंग॥ ॥पुढेंसाहावेंप्रसंगीं॥सांगणेआहेच योगी॥यसालागींतोसारंगी॥ दंशयेथेंजाणवी॥ १॥आस्थालागावीअर्जुना॥ ऐसीमनाचीवासना ह्मणोनिसांख्यतेंसज्जना॥ यथाशक्तिसांगतु॥२॥ बाहेरबाह्यविषया॥वीतरागेंदापुनिया॥ दृष्टिदेउनिभोंवया॥मध्यभागींअव काशीं॥३॥ घ्राणींवाहेनिजप्राणु॥ तेंविचमेळवीअपानु॥ तुकावदेदेतोमानु॥लोकामध्येंयोगीया॥४॥ २७॥ ॥श्लोक॥ ॥ यतेंद्रियमनोबुद्धिर्मुनिर्मोक्षपरायणः ॥विगतेच्छाभयक्रोधोयः सदामुक्तएवसः॥२८॥ ॥ सम० ॥ ॥ बुद्धींद्रियमनस्थैर्यमुनिर्मोक्षपरायण॥नाहींइच्छाभयक्रोधजालामुक्तचितोसदा॥२८॥ ॥ आर्या॥ ॥ इंद्रियमनबुद्धीतेंदमुनीधरिमुक्तिचीमनींचोप॥तोमुनिमुक्तह्मणावा नाहींज्यालाभयस्पृहाकोप॥२८॥ ॥दोहरा॥ ॥ जितबिंद्रिबुद्धिमनमुगतहिमेमनदेत॥इच्छाभयक्रोधजोतजेमुक्तिपदारथलेत॥२८॥ ॥ओवी॥ ॥ इंद्रियबुद्धिमन ११

जिंकिलें ॥ मुक्तिसाठीं मन घातलें ॥ इच्छाभयक्रोधत्यजिले ॥ मुक्तपदपावला ॥ २८ ॥
॥ ॥ अभंग ॥ ॥ बुद्धींद्रियेंही आकारा ॥ मनधरणेसाधनबारा ॥ मुनिमोक्षा-
च्यामंदिरा ॥ येकसरांचालिले ॥ १ ॥ चाडनधरीसिद्धिची ॥ तेंविंचकामनामोक्षाची
जालामुक्तसव्यसाची ॥ पुनः पुनाकितीसांगू ॥ २ ॥ पेंगाजन्माचेंसार्थक ॥ मातेंभासे
हेंचयेक ॥ जाणुनीतुकयाचाविवेक ॥ पदरींघेतीज्ञातये ॥ ३ ॥ २८ ॥ ॥ श्लोक ॥
भोक्तारंयज्ञतपसांसर्वलोकमहेश्वरम् ॥ सुहृदंसर्वभूतानांज्ञात्वामांशां
तिमृच्छति ॥ २९ ॥ ॥ सम॰ ॥ ॥ भोक्तायज्ञतपाचामीसर्वलोकमहेशमी
॥ सर्वांचामीसखामातेंजाणोनीशांतिपावतो ॥ २९ ॥ ॥ आर्या ॥ ॥ भोक्ता
यज्ञतपांचालोकेश्वरमीचवेदवेदांती ॥ भूतांचासुहृदहिमीमातेंजाणोनिपाव
तीअंती ॥ २९ ॥ ॥ दोहरा ॥ ॥ तपजग्यनकोभोगतासबलोकनकोईश ॥
शांतिलहेजोजानिकेंमोकोंप्रभुजगदीश ॥ २९ ॥ ॥ ओवी ॥ ॥ जपतपय
ज्ञाचाभोक्ता ॥ सर्वलोकांतईशकर्ता ॥ शांतिपावेजाणतां ॥ सर्वांचासखाजाण
मी ॥ २९ ॥ ॥ अभंग ॥ ॥ भोक्तायज्ञतपांचामी ॥ आहेऐश्वर्यभूमी ॥

सर्वलोकींमहेशमी ॥ सखातेंविसर्वांचा॥१॥ ऐसाप्रभुचाअन्वय॥जालातेथेंअहं
क्षय॥ मगशांतिवधुप्राय॥ तोपावतोनिर्मळ॥२॥ तुकाविनवीवारंवार॥माझ्या
मतींहर्षफार॥संतींनकरावाअव्हेर॥प्राकृतभाषाह्मणोनी॥२९॥ ३॥ ॥
इतिश्रीमद्भगवद्गीतायांश्रीकृष्णार्जुनसंवादेकर्मसंन्यासयोगोनामपंचमोऽध्या
यः॥ ५ ॥ ॥ वामन ॥ ॥ इतिटीकासमश्लोकीअध्यायापंचमावरी॥
श्रीपार्थसारथीकर्ताजो वामनमनोरथी ॥५॥ ॥ इतिगीतार्थबोधिन्यां-
श्रीमद्भगवद्गीताटीकायांपंचमोऽध्यायः ॥ ५ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु॥

श्रीगणेशायनमः॥ ॥वामन॥ ॥पूर्वाध्यायींअर्जुनाचाप्रश्नकींश्रे
यएकजें॥तेंसांगकर्मसन्यासअथवाकर्मयोगचि॥१॥श्रीकृष्णेंउत्तरदिल्हेकीं
मोक्षार्थीतयासियां॥दोहींविणेनव्हेसिधिहेसाक्षेपपरस्परें॥२॥हेंघडेसांख्य
योगासीकींत्यादोहींतयेकची॥अनुष्टितांसिधिपावेबोलिलींउभयत्रजे॥३॥स
न्यासस्तुमहाबाहोदुःखमाप्तुमयोगतः॥याश्लोकांनविनाकर्मबोलिलान्यासदु
र्लभ॥४॥तयोस्तुकर्मसंन्यासात्कर्मयोगोविशिष्यते॥याश्लोकींकर्मयोगातेंश्रे
ष्ठदोहींतबोलिला॥५॥हेंतोंविरुध्दकींकर्मयोगाचीनीचपायरी॥सन्यासज्ञान
सिध्दीचीसेवटीलीचपायरी॥६॥याचाबोलुनियांभावविरोधपरिहारया॥अ
ध्यायप्रथमारंभींकरीश्लोकद्वयेंहरि॥७॥काम्यानांकर्मणांन्यासंसन्यासंक
वयोविदुः॥ऐसेंपुढेंबोलणारअध्यायींअठराविया॥८॥सन्यासदोंपरीऐसा
कींकाम्यत्यागएकहा॥शिखासूत्रादिकत्यागन्यासआश्रमरूपतो॥९॥निर
ग्निआश्रमन्यासशुध्दचित्तासबोलिला॥कर्मयोगाविणेंजोकांपूर्वींदुर्लभवर्णि
ला॥१०॥टाकूनिकामसंकल्पकर्मेंकृष्णार्पणेंकरी॥कर्मींचत्याससन्याससाधे

१
या स्तवथोरहा ॥ ११ ॥ अशुधचित्तसन्यासीहो तांभ्रष्ट चि होइल ॥ निरग्निभग
तोकर्मेंशुधचित्त नहोंग्राके ॥ १२ ॥ नसाचजोक्रियाटाकी सन्यासपदवी विना ॥
प्रत्यवायेंबधहोतोउभयभ्रष्टअक्रिय ॥ १३ ॥ निरग्नि हूनिहीश्रेष्ठकर्मयोगअ
ग्रागुणें ॥ अक्रियाहूनि हि श्रेष्टहेंबोलेलजगद्गुरु ॥ १४ ॥ ॥ श्लोक ॥ श्री
भगवानुवाच ॥ ॥ अनाश्रितःकर्मफलंकार्यंकर्मकरोतियः ॥ ससंन्या
सीचयोगीचननिरग्निर्नचाक्रियः ॥ १ ॥ ॥ सम० ॥ ॥ कर्मीफळासक्त
नव्हेकरावेंकर्मतेंकरी ॥ तोसंन्यासीतोचियोगीननिरग्निनअक्रिय ॥ १ ॥ ॥ आ
र्या ॥ ॥ कर्मफळाचाआश्रयनकरुनिजोनरकरीतनिजधर्म ॥ तोसंन्यासीयो
गीनेणेअग्निकअनग्नितेंवर्म ॥ १ ॥ ॥ दोहरा ॥ ॥ करमफलनचाहेनहि
करमकरेनिःकाम ॥ जोगीसंन्यासीवहहै पावतहैसुखधाम ॥ १ ॥ ॥ ओवी
॥ ॥ कर्माचेंफळनापेक्षितकर्मकरी ॥ तोचीसंन्यासीयोगीअवधारी ॥ तोसा
ग्निकर्माचाअधिकारी ॥ तोकर्मयोगीनव्हे ॥ १ ॥ ॥ अभंग ॥ ॥ पांडवासि १
विस्मय ॥ देववदतांयोगीराय ॥ आपणाठावकाअन्वय ॥ असावाहेंवाटलें ॥ १ ॥

मगपुसावेंहाहेत ॥ कांकीजेथेंहरिप्रीत ॥ तेंचआपुलेंहीहित ॥ हेंतोंकधींटळेना 
॥२॥ ऐसाभावअंतरीचा ॥ जाणुनिसखावदेवाचा ॥ ऐकेंपार्थासंन्यायाचा ॥ मू
ळठावोफिटेल ॥३॥ आह्मीअंतरींठेविजे ॥ मगनेंकोणासिअर्पिजे ॥ ऐसेंनभेटे
लदुजें ॥ पैंमायेचेंआवडतें ॥४॥ अनन्यासीवंचीजोकां ॥ होयअधिकारीपातका
॥ असोकाळजीसुटका ॥ आजिजालेंहेंभाग्य ॥५॥ दानायोग्यतूंसत्पात्र ॥ जैसें
कन्येजोगेंगोत्र ॥ अथवापरमार्थीश्रोत्र ॥ जैसादीजेविरक्तीं ॥६॥ तरीऐकेंविच
क्षणा ॥ गुजघेईंअंतःकरणा ॥ अनश्रुनहेवासना ॥ कर्मफळींज्यानाहीं ॥७॥
करावेंतेंकरीतो ॥ तोचयोगीसंन्यासीतो ॥ ननिरग्निहीजोहोतो ॥ अक्रियतोना
ही ॥८॥ तुकाह्मणेविचक्षणी ॥ मांडुसगीतारत्नखाणी ॥ घ्यावीएकएकनिव
डुनीं ॥ वचनेंशेषशाईचीं ॥९॥ १॥ ॥श्लोक॥ ॥यंसंन्यासमिति
प्राहुर्योगंतंविद्धिपांडव ॥ नह्यसंन्यस्तसंकल्पोयोगीभवतिकश्चन ॥ २॥
॥समः॥ ॥संन्यासजोह्मणावातोकर्मयोगचिपांडवा ॥ कींकाम्यत्या
गसंन्यासकर्मयोगनत्याविण ॥ २॥ ॥आर्या॥ ॥ज्यासंन्यासह्मणा

वेंपार्थात्यालाचयोगतूंजाण॥सन्यासत्यागाविणकोणीयोगीनव्हेतुझीआण
॥२॥ ॥दोहरा॥ ॥ज्याकोंसन्यासीहिकहतहैवहैजोगतूंजान॥बिनसं
न्यासहिनोगनहीयहसाचतूंमान॥२॥ ॥ओवी॥ ॥ज्यातेंसंन्यासीह्मण
ती॥तोयोगजाणेंनिश्चिती॥संकल्पनटाकिलाकिरीटी॥तोयोगीनव्हे॥२॥
॥अभंग॥ ॥ह्मणावाजोसंन्यासतो॥कर्मयोगसिध्धहोतो॥दोहींमार्गेंजैसा
जातो॥येकाक्षेत्रावंदाया॥१॥कीयाकाम्याचेत्यागें॥जोसन्यासघेतूंआंगें॥क
र्मयोगहीप्रसंगें॥नव्हेकाहींदुसरा॥२॥तुकाविनवीभावार्थी॥लोकपरिसोतप
रमार्थी॥ज्यासप्रीतयोगपंथीं॥अहर्निशीअखंड॥३॥ २॥ ॥श्लोक॥
॥आरुरुक्षोर्मुनेर्योगंकर्मकारणमुच्यते॥योगारूढस्यतस्यैवशमः
कारणमुच्यते॥३॥ ॥सम०॥ ॥योगारुरुक्षजोज्ञानीकर्मत्यासहि
कारण॥तयाचयोगारूढासींध्यानस्थितिसकारण॥३॥ ॥आर्या॥
॥योगारुरुक्षुमुनिजोपार्थाकारणतयासितेंकर्म॥योगारूढमुनीलाकारणशा
मतोचिदेमहाशर्म॥३॥ ॥दोहरा॥ ॥जोकरमतेंलहतहैग्यानीचित्तबि

चार ॥ जोगहिलहे शांति हिगये बिखे बिंद्रियनमार ॥ ३ ॥ ॥ ओवी ॥ ॥ योगारूढजोइच्छिन ॥ तयाकर्महेंनिभ्रांत ॥ योगपावल्याशांत ॥ शमबुद्धितोची ॥ ३ ॥ ॥ अभंग ॥ ॥ योगारूढजोकांज्ञाता ॥ जगींव्हावयामान्यता ॥ संपादिनआमुचीवार्ता ॥ पैंगाजीवींधरोनी ॥ १ ॥ कर्मत्यासहीपांडवा ॥ कारणहोययागौरवा ॥ जैसेंतेलबकेंदिवा ॥ प्रभादावीअनंत ॥ २ ॥ तयायोगारूढालागी ॥ ध्यानस्थितकारणआंगीं ॥ पुढेंउजकीहेमांगी ॥ तुकयाकारागीरतो ॥ ३ ॥ ३ ॥

॥ श्लोक ॥ ॥ यदाहिनेंद्रियार्थेषुनकर्मस्वनुषज्जते ॥ सर्वसंकल्पसंन्यासीयोगारूढस्तदोच्यते ॥ ४ ॥ ॥ सम॰ ॥ ॥ जेव्हांनविषयींगुंनेकर्मीहीनरुतेमन ॥ भोगसंकल्पहीटाकीतेव्हांआरूढबोलिजे ॥ ४ ॥ ॥ आर्या ॥ जेव्हांकुंतीतनयाटाकुनिसंकल्पजाळआरूढ ॥ कर्मीआणिकविषयींउदासजोतोचियोगआरूढ ॥ ४ ॥ ॥ दोहरा ॥ ॥ बिखयनसोंओरकरमसोंहोयप्रीनजबदूर ॥ सबसंकल्पनकोंतजेजोगरहेतबपूर ॥ ४ ॥ ॥ ओवी ॥

॥ इंद्रियार्थीजालाहीन ॥ कर्मनिपजोंराहेआपण ॥ तयासिसंन्यासीम्हणू

न॥ योगारूढबोलिजे॥४॥ ॥अभंग॥ ॥जेव्हांनविषयींकदा॥युंते दैविकसंपदा॥तुजसांगतोंप्रमदा॥लाघवजैसेंस्त्रुकासी॥१॥ कर्मीहीनरुतेमन॥जैसेंश्रीपादास्वप्न॥जालागजवाजीवाहन॥जागाहोतांतेंमिथ्या॥२॥ टाकीभोगाचे संकल्प॥गेलाजीवींचाविकल्प॥तेव्हांआरूढज्ञानदीप॥बोलतोतुकयाऐसें॥३॥ ४॥ ॥श्लोक॥ ॥उद्धरेदात्मनात्मानंनात्मानमवसादयेत्॥आत्मैवह्यात्मनोबंधुरात्मैवरिपुरात्मनः॥५॥ ॥सम०॥ ॥उध्दरावेंस्वचित्ताला प्रपंचींबुडऊंनये॥ मित्रहेंआपुलेंचित्तशत्रुहीचित्तआपुलें॥५॥ ॥आर्या॥ ॥उध्दरिजेअपआपणाकरिजेआपुलानघातआहोतो॥मित्रहिअपुला आपणपार्थाअपुलाचिशत्रुहीहोतो॥५॥ ॥दोहरा॥ ॥निजआतमकूं उध्दरतअधोगमनकरेहेत॥आतमाहीरिपुआपनकोंआनमाहीसुखदेत॥५॥ ॥ओवी॥ ॥निजआत्माउध्दरत॥उद्योगावांचूनिमनठेवित॥आपला शत्रुआपणजाणत॥मित्रआपुलेंचित्तपैं॥५॥ ॥अभंग॥ ॥अरेविषयडोहांत॥जेकांबुडालेसंतत॥तेंतवउध्दरावेंचित्त॥आत्मबळेंअभ्यासें॥१॥ ३

नयेबुडऊंप्रपंची ॥ पुढेंजाणीवगेल्याची ॥ कोणपुसेधनवंताची ॥ लाजजायध
नगेल्या ॥ २ ॥ मित्रहेंआपुलेंचित्त ॥ साह्यजाहल्याफळदेत ॥ शत्रुहिहेंचहोत ॥ हा
उल्धरुनिअनर्थ ॥ ३ ॥ तुकाह्मणेसर्वाधिक ॥ साधनहेंचिगमेयेक ॥ चित्तजाल्याप्रस
न्मुख ॥ कायउणेंलाभासी ॥ ४ ॥ ५ ॥ ॥ श्लोक ॥ ॥ बंधुरात्मात्मनस्तस्य
येनात्मैवात्मनाजितः ॥ अनात्मनस्तुशत्रुत्वेवर्त्तेतात्मैवशत्रुवत् ॥ ६ ॥
॥ सम॰ ॥ ॥ मित्रत्याचेंचतेंचित्तजेंस्वरूपेंचि जिंकिलें ॥ अनात्मज्ञासशत्रु
त्वेंवर्त्तेचित्तचिशत्रुवत् ॥ ६ ॥ ॥ आर्या ॥ ॥ जिंकीमनजोत्याचेंमानसतेंआ
त्मबंधुहितकरतो ॥ मानसअनात्मयाचेंहातेंभ पुलारिपूहितोकरतो ॥ ६ ॥
॥ दोहरा ॥ ॥ आपहिजिंत्येआतमासोईबंधुयाहि ॥ जिनजीत्योनहिजुवहेअर
हेबरततनाही ॥ ६ ॥ ॥ ओवी ॥ ॥ बंधुरात्माचित्तजिंतोनी ॥ तेंचित्तबंधू
जाणोनी ॥ स्वरूपींवोळखीनाणी ॥ चित्तशत्रुवत्वर्त्ते ॥ ६ ॥ ॥ अभंग ॥
॥ मित्रचित्ततेंह्मणावें ॥ जेकांस्वरूपींविसावें ॥ विश्वरूपअनुभवें ॥ जिंकीस्वात्ममती
नें ॥ १ ॥ हेकांअलभ्यसाधन ॥ विधिइंद्रचंद्रेशान ॥ मानवतीऐसामान ॥ पैंभोगीतें

निवाडें ॥ २ ॥ नाहींतरी अज्ञानांत ॥ मिथ्या भवसिंधु दावीत ॥ तुका ह्मणे जीवाक्रांत ॥ होय त्रास तुहें झाल्या ॥ ३ ॥ ६ ॥ ॥ श्लोक ॥ ॥ जितात्मनः प्रशांतस्य परमात्मा समाहितः ॥ शीतोष्ण सुख दुःखेषु तथा मानापमानयोः ॥ ७ ॥ ॥ सम० ॥ ॥ शांताचें जिन चित्ताचें थारे चित्त बरें स्थिर ॥ मानापमानीं शीतोष्णीं सुख दुःखांत जें सम ॥ ७ ॥ ॥ आर्या ॥ ॥ निजमन शांतात्मा जो त्याचा आत्मा भवार्णवांत न रे ॥ शीतोष्णीं सुखदुःखीं मानामानीं असे समाहित रे ॥ ७ ॥ ॥ दोहरा ॥ ॥ जिन जित्यो है आतमा शांति लहे बहु ग्यान ॥ शीत उष्ण सुख दुःख जरा और मान अपमान ॥ ७ ॥ ॥ ओवी ॥ ॥ मन जिणे निशांति पावे ॥ तया परनिष्ठा जाणावें ॥ ऐशीयासि सुखदुःख न पावे ॥ तैसेच मानापमान ॥ ७ ॥ ॥ अभंग ॥ ॥ अरे शांताचें कुरूपती ॥ जितचित्ताची आयती ॥ थोरपण हें निगुती ॥ चित्त थारे स्वरूपीं ॥ १ ॥ त्याचें चित्त हेची वीरा ॥ मान अपमान वारा ॥ झगटल्या या शरीरा ॥ मेरू ऐशी धैर्यता ॥ २ ॥ तैसें च शीत उष्ण ॥ विषामृता जैसा लक्ष्ण ॥ सुख दुःखीं तो सहिष्ण ॥ तुकयाच को नेदिजे ॥ ३ ॥ ७ ॥ ॥ श्लो

क॥ ॥ज्ञानविज्ञानतृप्तात्मा कूटस्थोविजितेंद्रियः॥युक्तइत्युच्यतेयोगी समलोष्टाश्मकांचनः॥८॥ ॥सम॰॥ ॥ज्ञानेंअनुभवेंतृप्तजोकूटस्थजितेंद्रिय॥तोयोगारूढकीहेमभेंडाधोंडाजयासम॥८॥ ॥आर्या॥ ॥जोकूटस्थजितेंद्रियविज्ञानज्ञानतृप्तिनेंधाला॥ढेंकुळधोंडासोनेंज्यासमतोयुक्तमान्यविबुधाला॥८॥ ॥दोहरा॥ ॥जानेग्यानविग्यानजोऔरबिंद्रिजितहोय॥सोनोपाखानएकसमगनेसोजोगीहोय॥८॥ ॥ओवी॥ ॥ज्ञानविज्ञानतृप्तजाले॥अविनाशाविषयगेले॥जयांस्रुवर्णमृत्तिकाहेंनकळे॥तेयोगीजाणतूं॥८॥ ॥अभंग॥ ॥ज्ञानभोज्यगुरूहातें॥धालाजेउनितृप्तीतें॥स्फुरेंवउद्गारअवचितें॥पैंगादेतूंसर्वदा॥१॥जितेंद्रियब्रह्मचारी॥राहेकूटस्थव्यापारीं॥भासेनभासेअंतरीं॥ज्याचाअंतअढळेना॥२॥तोचयोगारूढहेम॥धोंडाभेंडाजयासम॥तुकाह्मणेसर्वोत्तिम॥हेरोकडीप्रतीती॥३॥ ८॥ ॥श्लोक॥ ॥सुहृन्मित्रार्युदासीनमध्यस्थद्वेष्यबंधुषु॥साधुष्वपिचपापेषु समबुद्धिर्विशिष्यते॥९॥ ॥सम॰॥ ॥मित्रशत्रुउदासीनमध्यस्थअ

सखेसखे ॥ साधुपापीअशा सर्वीसमबुद्धिविशेषनो ॥ ९ ॥ ॥ आर्या ॥
॥ द्वेष्यउदासीनरिपूबंधूमध्यस्थसुहृदआणि मित्र ॥ साधूपापीयांलापाहेसमतो
विशिष्टसर्वत्र ॥ ९ ॥ ॥ दोहरा ॥ ॥ मित्रउदासीशत्रुपुनिऔरनिजबंधुसम
न ॥ साधुपापीचित्तमेंगनेएकउनमान ॥ ९ ॥ ॥ ओवी ॥ ॥ सोयरेबंधूमि
त्रजन ॥ वैरीसखाउदासीन ॥ यातेंमानीसमान ॥ तोसमबुधी ॥ ९ ॥ ॥ अभं
ग ॥ ॥ कोणींकापिलियामान ॥ दुःखेंनपवेरुदन ॥ मित्रजोडेराजश्शुन ॥ गज
वाहनीमिरवी ॥ १ ॥ दोन्हीसारिखेजयासी ॥ तैसेंचित्तसख्यापासी ॥ घेतनित्यवि
साव्यासी ॥ असखाहीतेविंच ॥ २ ॥ साधुबोधामिथ्याबोली ॥ समबुधीपूजाके
ली ॥ तुकाह्मणेज्ञानवल्ली ॥ त्याचीजालीसुफळ ॥ ३ ॥ ॥ श्लोक ॥ ॥ योगी
युंजीतसततमात्मानंरहसिस्थितः ॥ एकाकीयतचित्तात्मानिराशीरपरि
ग्रहः ॥ १० ॥ ॥ सम० ॥ ॥ कर्मयोगींचित्तयोजीसदाएकांतसेउनी ॥ स्थि
रचित्ततनूएकदाकीआशापरिग्रह ॥ १० ॥ ॥ आर्या ॥ ॥ जोसंयमचि
त्तात्मापार्थानिष्कामसंचयत्यागी ॥ येकांतीएकाकींब्रह्मींयोजीमनासजोयोगी ॥ ५

॥१०॥ ॥दोहरा॥ ॥बैठेकैसेएकचित्तजोगीसाधेजोग॥एकाकीचाहेन कलुजोरेनहिंसुखभोग॥१०॥ ॥ओवी॥ ॥योगीयेकांतीबैसोनी॥असावेंरहस्यध्यानी॥चित्तआत्माजिंतोनी॥टाकीआशापरिग्रह॥१०॥ ॥अभंग॥ ॥कर्मयोगीचित्तयोजीसदोदित॥जैसायोगीघेतदिव्यरस॥१॥ येकांतसेवनआवडतेंमन॥पथ्यानेंलोटूनशाहाणावागे॥२॥ स्थिरचित्तेंचित्तीयेकजगत्पती॥सद्विद्यासप्रीतीअनुरागें॥३॥टाकीअशानैसापरिग्रहवीरेशा॥नाहींजीवदशातुकाह्मणे॥४॥१०॥ ॥श्लोक॥ ॥शुचौदेशेप्रतिष्ठाप्य स्थिरमासनमात्मनः॥नात्युच्छ्रितंनातिनीचंचैलाजिनकुशोत्तरं॥ ११॥ ॥सम०॥ ॥स्थापूनियांशुध्धदेशीं स्थिरआसनआपुलें॥नबहूउंचना नीचकुशाचर्मावरीपट॥११॥ ॥आर्या॥ ॥शुध्धस्थानींअपुलेंस्थिर आसनघालुनीसुयोगरते॥अत्युच्चनीचहिनजेंवस्त्राजिनदर्भज्यांतउत्तरतें ॥११॥ ॥दोहरा॥ ॥ठौरपुनितनिहारकेंकरिआसनबिस्तार॥नहीऊंचोनीचोनहीपटकुशाचर्मबिथार॥११॥ ॥ओवी॥ ॥पवित्रशुध्धदेशीं

जाण ॥ स्थीरकरावेंआसन ॥ उंचनीचनसावेंजाण ॥ कुशाचर्मआथरोनी ॥ ११ ॥

॥ अभंग ॥ ॥ स्थापूनियांशुध्यदेशीयेंप्रसिध्य ॥ प्रयागअंबुधसंतग्राम ॥ १ ॥ स्थीरहेंआपुलेंआसनजेणेंकेलें ॥ बहूउंचललेंऐसेंनको ॥ २ ॥ नीचतरिभूमी दोषलागेउर्मी ॥ कुशामृगचर्मीपटदिव्य ॥ ३ ॥ तेथेंशुभमुहूर्तेंबैसावेंनिरुतें ॥ आठवीगुरुतेंतुकाह्मणे ॥ ४ ॥ ११ ॥

॥ श्लोक ॥ ॥ तत्रैकाग्रंमनः कृत्वायतचित्तेंद्रियक्रियः ॥ उपविश्यासनेयुंज्याद्योगमात्मविशुध्धये ॥ १२ ॥

॥ समं० ॥ ॥ करूनिमनएकाग्रस्थिरचित्तेंद्रियक्रिया ॥ चित्तशुध्य्यर्थयोजावायोग बैसोनिआसनीं ॥ १२ ॥

॥ आर्या ॥ ॥ त्याआसनिंबैसोनिकरूनिएकाग्रधीरचित्तमुनी ॥ आत्मविशुध्धीसाठींयोजावायोगइंद्रियेंदमुनी ॥ १२ ॥

॥ दोहरा ॥ ॥ करीबैठेमनकोंथीरसबबिंद्रियनकोंजीत ॥ करिकेआतमशुध्धकोंजोगकरेयारीत ॥ १२ ॥

॥ ओवी ॥ ॥ मनइंद्रियेंचित्तनेमुनी ॥ बैसावेंतयेआसनीं ॥ आत्मशुध्धीव्हावयालागोनी ॥ योगकरावा ॥ १२ ॥

॥ अभंग ॥ ॥ करूनीमानसएकाग्रहव्यास ॥ नेदीबाह्यपैसमनाघेवों ॥ १ ॥ स्थिर

चित्तहोयइंद्रियांसक्रीया॥बोळंगतिपायासदोदित॥२॥चित्तसुध्यर्थाचा योगपै

हटाचा॥जयोआसनाचातुकाह्मणे॥३॥१२॥ ॥श्लोक॥ ॥समंकायशिरो

ग्रीवंधारयन्नचलंस्थिरः॥संप्रेक्ष्यनासिकाऽग्रंस्वंदिशश्चानवलोकयन्॥

१३॥ ॥सम॰॥ ॥माजपाठशिरग्रीवानीटहेधरुनीस्थिर॥ठेऊनदृष्टि

नासाग्रीनपाहाव्यादिशादशा॥१३॥ ॥आर्या॥ ॥कायशिरग्रीवातेंस

मअचळकरूनिनासाग्र॥पाहुनिदिशानपाहुनिकरूनिब्रह्मींमनासएकाग्र॥

१३॥ ॥दोहरा॥ ॥कायाशिरऔरग्रीवकोंराखेएकसमान॥दृष्टि

धरेनिजनाशिकादेखनहीदिशआन॥१३॥ ॥ओवी॥ ॥कायासम

करोनिकटीहनवटी॥दृष्टीदीजेनासापुटीं॥स्थीरकीजेश्वासाचीपरिपाटी॥

दिशाअवलोकननकरावें॥१३॥ ॥अभंग॥ ॥माजपाठशीरग्रीवा

नीटस्थीर॥धरूनिनिर्धारस्थिरकीजे॥१॥उठनांउपाधीतैशादेहिंआधी॥गि

कीजेअंबुधीनदाजैसा॥२॥आवरोनिमनाधरीजोधारणा॥तुकाह्मणेजाणा

योगीयाते॥३॥१३॥ ॥श्लोक॥ ॥प्रशांतात्मा विगतभीर्ब्रह्मचारि

व्रतेस्थितः॥मनःसंयम्यमच्चित्तोयुक्तआसीतमत्परः॥१४॥ ॥सम०
॥ ॥मननिर्भयजोशांतब्रह्मचारीव्रतस्थजो॥मद्रूपींलाउनीचित्तवसेमत्प
रहोउनी॥१४॥ ॥आर्या॥ ॥मजवरिमनज्याचेंत्याशांतात्याचेंसमूळ
भयपरतो॥सब्रह्मचर्यरतजोयुक्तअसोमनदमूनिमत्परतो॥१४॥ ॥दोह
रा॥ ॥शांतगहेभयकोंनजेब्रह्मचर्यव्रतलेत॥मोमेंराखेरोंकेमनलहेज्योग
कोंभेद॥१४॥ ॥ओवी॥ ॥निर्मळमनेंकरूनी॥निर्भयमनींहोउनी॥ब्रह्म
चर्यआचरोनी॥मजसांनिध्यहोइजे॥१४॥ ॥अभंग॥ ॥असेसर्वका
ळचित्तासीनिरवळ॥योजुनीप्रबळनिर्भयजो॥१॥शांतमतीकरणेंजीतिअंतःकर
णें॥व्रतनिर्मळपणेंआचरेहें॥२॥चित्तासीमद्रूपींलाऊनीनिक्षेपी॥वसेस्वस्वरू
पींमत्परजो॥३॥तुकाह्मणेतेथेंसिध्दीस्वसामर्थ्यें॥येतांयोगीनाथेंनपाहाणें॥
४॥१४॥ ॥श्लोक॥ ॥युंजन्नेवंसदात्मानंयोगीनियतमानसः
॥शांतिनिर्वाणपरमामत्संस्थामधिगच्छति॥१५॥ ॥सम०॥ ॥ऐ
सेंसदांचित्तयोजीयोगीआवरूनीमन॥मोक्षासिसाधनअसीमाझीनोशांतिपा

वतो॥१५॥ ॥आर्या॥ ॥नियमुनिचित्तब्रह्मींयोजीजैसासदैवजोयोगी॥मद्विषयाजेपरमातेहेनिर्वाणशांतिनोभोगी॥१५॥ ॥दोहरा॥ ॥इहबिधिकरेजोजोगकोंनिजमनकोंथिररारव॥शांतिलहेमोकोंमिलेरहेअभीरसचारव॥१५॥ ॥ओवी॥ ॥चित्तठेवीमाझेठाईं॥मीनिजवस्तूपाहीं॥समाधिहोऊनिराहीं॥मजतत्परअर्जुना॥१५॥ ॥अभंग॥ ॥एवंचित्तऐसेंयोजुनीविन्यासे॥मनहातीतैसेंआकळावें॥१॥मोसाअधिकारीहोयनिर्विकारी॥शांतिदेवीवरीश्रीकृष्णाची॥२॥तुकाह्मणेयेथेंसंतांचीअनाथ॥षड्नीत्यापंथलावीदेव॥३॥१५॥ ॥श्लोक॥ ॥नात्यश्नतस्तुयोगोऽस्तिनचैकांतमनश्नतः॥नचातिस्वप्नशीलस्यजाग्रतोनैवचार्जुन॥१६॥ ॥सम०॥ ॥नयोगबहुखातांहीनएकाग्रलंघनीं॥नबहुनिजतांनित्यजागतांहीनअर्जुना॥१६॥ ॥आर्या॥ ॥केवळउपवासालायोगनकोआणिफारखात्याला॥जागेफारनिजेहीकौंतेयायोगपाररवात्याला॥१६॥ ॥दोहरा॥ ॥जोगलहेनहिबहुभकेनहिबिनखायेमीत॥सोवतेहिसोवेनहिंअ

तिजागतनहिनीन॥१६॥ ॥ओवी॥ ॥सदांमनलक्ष्मीअसतां॥नयेबहु
खातां॥उपोषणनकरितां॥नजागतांअर्ज्जुना॥१६॥ ॥अभंग॥ ॥न
व्हेयोगऐसाखावेंबहूतैसा॥लंघनेंभरवंसाजायसारा॥१॥बहूझोंपघेणेंयोगा
चीलक्षणें॥नव्हतीकींजागरणेंचिरजेथें॥२॥अर्ज्जुनातूंजाणयोगाचेंप्रमाण॥
अंतरींचीखूणआह्मीसांगों॥३॥तुकाह्मणेदेवोरूपाकूपाहावो॥योगाचावोल
वोआतुवडी॥४॥१६॥ ॥श्लोक॥ ॥युक्ताहारविहारस्ययुक्तचेष्ट
स्यकर्मसु॥युक्तस्वप्नावबोधस्ययोगोभवतिदुःखहा॥१७॥ ॥स
म०॥ ॥विहारआहारचेष्टाकर्मींनिद्राप्रबोधही॥युक्तज्याचीतयासाधेयो
गजोदुःखनाशक॥१७॥ ॥आर्या॥ ॥आहारविहारनियतकरितो
कर्मींहिनेमिल्याचेष्टा॥फारनजागेननिजेयोगतयासौख्यदेकुरुश्रेष्ठा॥१७॥
॥दोहरा॥ ॥जुगतआहारबिहारजोकरमजोगपुनिहोय॥जाग
तसोवतजुगतसोंसोडारतदुखधोय॥१७॥ ॥ओवी॥ ॥अतिआहा
रनसावा॥कर्मींबोधअसावा॥बुध्दिवंतेंसाधावा॥योगदुःखनाशक॥१७॥

॥अभंग॥ ॥युक्तीनेंवागिजेसिणनआणिजे॥आहारुघेइजेस्वल्पुतैसा
॥१॥चेष्टाकर्मसूत्रेंयुक्तीचींपवित्रें॥जाणिजेस्वतंत्रेंजाणतेनी॥२॥ निद्राकिंवाजा
गायेथेंमहाभागा॥युक्तीसुस्थगंगापाहिजेगा॥३॥तयासीहादुःखनासोनीदेसुख
॥तोयेगुपेंचोखतुकयालाभे॥४॥१७॥ ॥श्लोक॥ ॥यदाविनियतंचित्त
मात्मन्येवावतिष्ठते॥निस्पृहःसर्वकामेभ्योयुक्तइत्युच्यतेतदा॥१८॥
॥सम॰॥ ॥आत्मस्वरूपींचचित्तराहेजेव्हांनियोजिलें॥सर्वकामस्पृहाशून्यह्म
णावासिध्यतेधवा॥१८॥ ॥आर्या॥ ॥जेव्हांब्रह्मींचवसेज्याचेंनियमित
सदैवअंतरतो॥निस्पृहकामींतेव्हांयुक्तह्मणावासुखानअंतरतो॥१८॥
॥दोहरा॥ ॥जबनिजचित्तकोंरोकिकेंराखेआतममांह॥नजेसबेजोकाम
नासोजोगीनरनाह॥१८॥ ॥ओवी॥ ॥युक्तआहारस्वल्प॥कर्मचेष्टा
करीअल्प॥सुषुप्तीअसेनेमस्त॥सिध्दतेव्हांखरा॥१८॥ ॥अभंग॥
॥आत्मरूपींचित्तरमेसदोदित॥निस्पृहसंतृप्तस्वरूपाघन॥१॥कामहोयशू
न्यगतीनेअनन्य॥पाहातांअमान्यनहोंआह्मी॥२॥ सिध्दऐसेंत्यातेंह्मणावेंस

वर्थे॥ ऐसें रमानाथें वर्णियेलें॥ ३॥ ध्यान कैसें कीजे तें श्रोत्रीं घेइजे॥ तुकाह्मणे
माझें हीत ऐका॥ ४॥ १८॥ ॥श्लोक ॥यथादीपोनिवातस्थोनेंग
तेसोपमास्मृता॥ योगिनोयतचित्तस्ययुंजतोयोगमात्मनः॥ १९॥
॥सम०॥ ॥निवांतसदनीं दीप नहालेउपमा असी॥ चित्तास योगिया
च्याजो स्वात्मयोगासियोजितो॥ १९॥ ॥आर्या॥ ॥जो आत्मयोगयो
जी जितमनज्याचा हि कामरिपु मेला॥ तो सद्योगी पावे स्थिर निर्वात दीपउप
मेला॥ १९॥ ॥दोहरा॥ ॥जैसो दीप समिरबिन रहे जोत टहराय॥ जो
गी निश्चळ चित्त सों उपमा है याभाय॥ १९॥ ॥ओवी॥ ॥चित्त नेमि
लें असे॥ केवळ आत्माचि दिसे॥ निवात सदनीं दीप असे॥ तैसी उपयोगीया
सी॥ १९॥ ॥अभंग॥ ॥निवात सदनीं दीपउपमेनी॥ चंचळ आस
नीं होऊं नये॥ १॥ योगियाचें चित्त मिळे ऐकामात॥ मज रूा हे मात येकविध॥ २॥
किंवा पतीव्रता आलिंगीत कांता॥ वियोगाची वार्ता सहज राहे॥ ३॥ तुकाह्मणे
घनवृष्टि धरासन॥ तैसें योगी मन स्थिरावलें॥ ४॥ १९॥ ॥श्लोक॥ ॥य

त्रोपरमतेचित्तंनिरुद्धंयोगसेवया॥यत्रचैवात्मनात्मानंपश्यन्नात्मनितुष्यति॥२०॥ ॥सम॰॥ ॥जेथेंउपरमेचित्तयोगमार्गेनिरोधिलें॥जेथेंचित्तेंआत्मयातेंपाहेतोषेतयांतचि॥२०॥ ॥आर्या॥ ॥जेथेंउपरमपाबियोगनिरुद्धमननिजसुखेंपुष्ट॥जेथेंआपणअपणांपाहूनिअपुल्याचठाईंसंतुष्ट॥२०॥ ॥दोहरा॥ ॥जोगीसेवतजोगकोंचित्तजहांटहराय॥निरखतआतमकोंतहारहतसदांसुखताय॥२०॥ ॥ओवी॥ ॥चित्तनेमिलेंअसे॥आत्माकेवळदिसे॥जेथेंआत्मावसे॥संतोषपाहे॥२०॥ ॥अभंग॥ ॥जेथेंउपरमेचित्तयोगप्रेमें॥सहजदेहधर्मेंसांडवला॥१॥योगाचियापंथेंनिरोधीसर्वार्थ॥उसंतपैजेथविरामले॥२॥जेथेंआत्मामिळेचित्तानंदमेळे॥अखंडितखेळेनिरामयीं॥३॥पाहातोषट्पदजेंविंअरविंद॥तुकाह्मणेनादसुरेठायीं॥४॥२०॥ ॥श्लोक॥ ॥सुखमात्यंतिकंयत्तद्बुद्धिग्राह्यमतींद्रियम्॥वेत्तियत्रनचैवायंस्थितश्चलतितत्त्वतः॥२१॥ ॥सम॰॥ ॥तेथेंअनंतसुखजेंबुद्धिग्राह्यअतींद्रिय॥जाणेत्या

१० तेंमगनहातत्लापासूनियांचळे॥२१॥ ॥आर्या॥ ॥बुद्धिग्राह्यअतींद्रियआत्यंतिकसौख्यजेंतयाजाणें॥ जेथेंसुस्थिरहोतांतत्त्वापासूननहोतसेजाणे॥२१॥ ॥दोहरा॥ ॥जोसुखबिंद्रियनतेंपरेंबकुतबुद्धिकरलेत॥वासुखकोंजानेसबेंतापछेहैनीत॥२१॥ ॥ओवी॥ ॥अतिसुखजेंअनुभवेंकरूनी॥इंद्रियांअगोचरबुध्दिज्ञानेंजाणोनी॥जोस्थिरदृढआपुलेमनीं॥तोनचळेकाहींनिश्चित॥२१॥ ॥अभंग॥ ॥नसेअंतत्यासअनंतह्मणावें॥सुखानेंमिळावेंऐसेठायीं॥१॥बुद्धिदृढधरीतैंत्रीचिइंद्रियें॥दमीयोगराययोग्यांचातो॥२॥जाणेत्यातेंमगतोहाकरितोकर्म॥वृत्तीसजोधर्मचळोंनेदी॥३॥पाउलेंपांथीकजैसीउपेक्षिना॥तुकाह्मणेमनाधरूनिवागे॥४॥२१॥

॥श्लोक॥ ॥यंलब्ध्वाचापरंलाभंमन्यतेनाधिकंततः॥यस्मिन्स्थितोनदुःखेनगुरुणाऽपिविचाल्यते॥२२॥ ॥सम०॥ ॥नमानीलाभअधिकत्यासुखाहुनआणखी॥नचळेथोरदुःखेंहीपावतांज्यासुखींस्थिती॥२२॥ ॥आर्या॥ ॥ज्यालाभातेंपाउनिलाभनमानीदुजाअधिकमगतो १०

॥जेथेंस्थिरमनकरितांमोठ्यादुःखेंहितोनडगमगतो॥२२॥ ॥दोहरा॥
॥ज्यापायेलाभनअधिकऔरज्ञानरेमीत॥थिरतागहिडोलेनहिबडुदुःखपाये
चित्त॥२२॥ ॥ओवी॥ ॥यापरताआणीकनाहीं॥त्याहूनअधिकनमा
नीकाहीं॥राहूनसुखाचेबाहीं॥अत्यंतदुःखेंनचळे॥२२॥ ॥अभंग॥
नमानीतोलाभआणीकत्याहुन॥जीवासमाधानआखंडीत॥१॥ज्यासुखाची
गतीहातासआलिया॥मगकष्टजालीयानेघेजीवीं॥२॥आधिव्याधिरोगराज
क्षोभजाला॥तुकाह्मणेत्यालाआठवेना॥३॥२२॥ ॥श्लोक॥ ॥तंवि
द्याद्दुःखसंयोगवियोगंयोगसंज्ञितम्॥सनिश्चयेनयोक्तव्योयोगोनि
र्विण्णचेतसा॥२३॥ ॥सम॰॥ ॥दुःखसंयोगवृत्तीचातद्वियोगांत
आयता॥चित्तात्मयोगतोयत्नेंसाधावादृढनिश्चयें॥२३॥ ॥आर्या॥
॥दुःखाचालेशानसेज्यांतहितोयोगपांडवाजाण॥सुविरक्तेंयोजावानिःसंशय
हाचियोगनिर्वाण॥२३॥ ॥दोहरा॥ ॥दुःखदुकेसंजोगकोंमानलेतबि
योग॥निश्चयकरिकेंजोगकरेताकूंकहतज्ञुजोग॥२३॥ ॥ओवी॥

११

जेथेंदुःखसंबंधनाहीं॥ नोचियोगजाणावा निश्चितपाहीं॥ वैराग्ययुक्तअंतः
करणकरूनिराहीं॥ योगाभ्यासीं॥२३॥ ॥अभंग॥ ॥दुःखसंयो
गाचीधुळिअंगानलागे॥ नभजैसेंउबगेवज्रघायें॥१॥ बुद्धीयोगींकैशीपाण्यं
तमासोळी॥ मगनळमळीपार्थाकोण॥२॥ चित्तआत्मरूपींराहेसार्वकाळ॥ ऐ
साप्रेत्नेंबळस्विकारीतूं॥३॥ निश्चयसदृढऐसाचसाधावा॥ तुकाह्मणेदावाय
मनकरी॥४॥२३॥ ॥श्लोक॥ ॥संकल्पप्रभवान्कामांस्त्यक्त्वास
र्वानशेषतः॥मनसैवेंद्रियग्रामंविनियम्यसमंततः॥२४॥ ॥सम०
॥ ॥संकल्पकरितांजालेकामतेसर्वटाकुनी॥मनेंचिइंद्रियग्रामदंडू
निसकळास्थळीं॥२४॥ ॥आर्या॥ ॥संकल्पेंजेउठतीपार्थातेंसर्वका
मसांडावे॥सर्वत्रइंद्रियाचाचित्तेंगणदमुनियोगमांडावे॥२४॥ ॥दोह
रा॥ ॥संकल्पनजोकामनातिन्हेंतजेचित्तचाय॥मनसोंरोकेविंद्रियनजोग
करेयाभाय॥२४॥ ॥ओवी॥ ॥संकल्पमात्रेंचिजाले॥ कामतेसर्व
टाकिले॥मनेंइंद्रियग्रामधरिले॥दंडूनियांसर्वत्र॥२४॥ ॥अभंग॥

११

॥संकल्प करितांकामातेंत्यागुनी॥शुचीअनुष्ठानींसर्वत्यागे॥१॥मनस्वीरखे क्तो विषयद्वारींरवळ॥कर्णयामबळभंजीलंदें॥२॥सर्वाठाईंदंडमनाहानिंदि ल्हा॥किंल्हावाबैसलारामजपीं॥३॥तुकाह्मणेगोष्टीफुकटनसाधे॥विरळा कोटिमध्येंयोगीरावो॥४॥२४॥ ॥श्लोक॥ ॥शनैःशनैरुपरमेद्बु ध्याधृतिगृहीतया॥आत्मसंस्थंमनःकृत्वानकिंचिदपिचिंतयेत्॥२५॥ ॥सम०॥ ॥धारणायुक्तबुद्धीनेंव्हावेंस्थीरहळूहळू॥योजूनिचि त्तचिन्मात्रींकाहींचिंतूंनयेमग॥२५॥ ॥आर्या॥ ॥धैर्येंवळउनिम तिलाहळूहळूउपरतीसजिंकावें॥ब्रह्मीस्थिरमनकरुनीकाहींमगपांडवान चिंतावें॥२५॥ ॥दोहरा॥ ॥धीरजधरीओरबुद्धिकरेरहेहरेसब त्याग॥कछुकरेनहिकामनाआनमसोंअनुराग॥२५॥ ॥ओवी॥ ॥बुद्धिकरूनिधारणेने॥हळुहळूस्थीरकरीमन॥चिन्मात्रींयोजीचित्ता लागुन॥मगकाहीचिंतूनये॥१॥ ॥अभंग॥ ॥हेधारणायुक्ती गुरुमुखेंसाधी॥सहजसमाधीआमहोय॥१॥नव्हेगाढमूढलोकरंजवणें॥

१२ तटस्थतायेणेंदेहावरी ॥ २॥ ताटस्थ्यतेनामसमाधीबोलती ॥ उघडफजि
तीजनामध्यें ॥ ३ ॥ येथेस्वरूपांतभवेन्ना हकुहाकू ॥ स्थिरमनमेकूचिन्मात्रींच
॥ ४ ॥ काहींनचिंतावेंमगपेठाजाल्या ॥ तुकाह्मणेआल्यानिन्हीलोक ॥ ५ ॥ २५
॥ ॥ श्लोक ॥ ॥ यतोयतो निश्चरतिमनश्चंचलमस्थिरम् ॥ त
तस्ततो नियम्यैतदात्मन्येववशंनयेत् ॥ २६ ॥ ॥ सम० ॥ ॥ ज्या
ज्यापदार्थींनिघतेंमनचंचलअस्थिर ॥ तेथेंतेथेंचिआत्माहाकरावेंवशात्यां
ततें ॥ २६ ॥ ॥ आर्या ॥ ॥ चंचळमनअस्थिरहें ज्याज्याविषयाकडे
चिबाधांवे ॥ त्यात्यापासुनिआणुनिसूज्ञेंहृदयींहकूचबांधावें ॥ २६ ॥
॥ दोहरा ॥ ॥ मनचंचलजितजितचलेंताकोंराखेरोक ॥ करिसंजमनि
तआनमासाजेताकोंठोक ॥ २६ ॥ ॥ ओवी ॥ ॥ मनचंचलनाहींस्थि
र ॥ धांवेसैराटनधरीधीर ॥ तयाआवरोनि विचार ॥ राहेंआत्मतत्वीं ॥ २६ ॥
॥ अभंग ॥ ॥ ज्याज्यापैंपदार्थीचित्ताचेंचळण ॥ निघेतेथेंज्ञान १२
भुधठेवीं ॥ १ ॥ मनहेंचंचळअस्थिरपांडवा ॥ याचानित्यदावापरमार्थी ॥ २ ॥

ह्मणो निजें पाहे तेथें आत्मा त्यवी ॥ वश्यलें वळवी मनोवृत्ती ॥ ३ ॥ त्यांत चि असतां विसर लें पुरे ॥ करावें जागें रे तुकाह्मणे ॥ ४ ॥ ॥श्लोक॥ ॥प्रशांतमनसंह्येनंयोगि नंसुखमुत्तमम् ॥ उपैतिशांतरजसंब्रह्मभूतमकल्मषम् ॥ २७ ॥ ॥सम० ॥ ॥ऐसा प्रशांत चित्तानें योग्यातें सुख उत्तम ॥ साधे रज तमातीत ब्रह्मरूप अक र्मक ॥ २७ ॥ ॥आर्या॥ ॥ शांतात्मा निष्पाप ब्रह्मींकाहीं असेन अंतरज्या ॥ उत्तम सुख वरितें त्याजो हायोगी अखंड शांतरजा ॥ २७ ॥ ॥दोहरा॥ ॥ जाके मन मे शांति है पाप रहित जो होय ॥ मगन जु ब्रह्मानंद कों ता जोगी को होय ॥ २७ ॥ ॥ओवी॥ ॥ अंतःकरण ज्याचें शांत ॥ त्या योगिया सुख अत्यंत ॥ रजो गुणें ब्रह्मभूत ॥ ऐशिया प्रशांती ॥ २७ ॥ ॥अभंग॥ ॥ ऐसे या चित्ता तें प्रशांत दशे लोला ॥ योगाभ्यासे मला सुख पार्था ॥ १ ॥ साधे रज तमा अतीत ब्रह्मता ॥ रूप अकर्मता तुकाह्मणे ॥ २ ॥ २७ ॥ ॥श्लोक॥ ॥ युंजन्नेवंसदा त्मानंयोगीविगतकल्मषः ॥ सुखेनब्रह्मसंस्पर्शमत्यंतंसुखमश्नुते ॥ २८ ॥ ॥सम०॥ ॥ योजी ऐसा सदा चित्त योगी ज्यास न वासना ॥ ब्रह्मस्पर्शें

१२ अनायासें अत्यंतसुखभोगिनो ॥ २८ ॥ ॥ आर्या ॥ ॥ एवंसंततनयोगीयो
जीनिष्पापजोमनायास ॥ ब्रह्मस्पर्शसुखातेंपावेअत्यंततोअनायास ॥ २८ ॥
॥ दोहरा ॥ ॥ जोजोगीइहबिधिकरे जोगपापकोंत्याग ॥ सहजब्रह्मकोंसु
खलहेरहेआपअनुराग ॥ २८ ॥ ॥ ओवी ॥ ॥ सदाआत्मचिंतनकरितां ॥
योगीकिल्बिषेंजिंनीतखना ॥ सुखेंचिब्रह्मीसायुज्यता ॥ अनंतसुखपावतो ॥ २८
॥ ॥ अभंग ॥ ॥ चित्तसदायोजीजैसाकामीबंधु ॥ किंवालक्षव्याधुधरी
वनीं ॥ १ ॥ योगीतोपांडवादुजीनवासना ॥ मायेवीणतान्हासुखानेणे ॥ २ ॥ ब्रह्मस्प
र्शेनिवेसायासेंवेंचला ॥ अत्यंतसुखालाभोक्तातोची ॥ ३ ॥ इतरतिंसोंमेंनव्हेसंपाद
णी ॥ तुकातेकाहाणीऐकेचिना ॥ ४ ॥ २८ ॥ ॥ श्लोक ॥ ॥ सर्वभूतस्थ
मात्मानंसर्वभूतानिचात्मनि ॥ ईक्षतेयोगयुक्तात्मासर्वत्रसमदर्शनः ॥ २९
॥ ॥ सम० ॥ ॥ सर्वभूतांमधें आत्माभूतेंतींआत्मयामधें ॥ नित्ययो
गींचित्तअसेतोपाहेसमदर्शनी ॥ २९ ॥ ॥ आर्या ॥ ॥ ओआत्म्यामाजीभूतें १२
पाहेभूतांतआत्मयासमहा ॥ दृढयोगयुक्तआत्माजाचातोपाहणारजगसमहो ॥ २९

॥ ॥दोहरा॥ ॥मोहीलखेसबठौरजोसबकोमोहीमांहि॥मोकोंदेखत सोसदांसोहूंदेखनतांहि॥२९॥ ॥ओवी॥ ॥आत्मत्वेंसर्वभूतेंदेखें॥ सर्वात्माआपणकौतुकें॥योगयुक्तआत्मादेखे॥सर्वत्रसमानतया॥२९॥ ॥अ भंग॥ ॥सर्वभूतांमध्येंआत्माअसेयेक॥भूतेंसकळिकआत्मयांत॥१॥ नित्य योगीचित्तऐसाठेविजरीं॥सर्वनेत्रद्वारींसमदृश्री॥२॥योगनव्हेतरीऐसामार्गचाळे ॥येणेयोगेंफोलनव्हेसाधू॥३॥तुकाह्मणेकृष्णयेकनवलसांगे॥तोश्लोकप्रसंगेंऐ कीजेहो॥४॥२९॥ ॥श्लोक॥ ॥योमांपश्यतिसर्वत्रसर्वंचमयिप श्यति॥तस्याहंनप्रणश्यामिसचमेनप्रणश्यति॥३०॥ ॥सम०॥ ॥मातेंसर्वत्रजोपाहेपाहेसर्वमदंतरीं॥मीत्याचात्याससोडीनातोमाझ्मासोडिनाम ळा॥३०॥ ॥आर्या॥ ॥पाहेसर्वत्रमलामाझ्याठाईंहिसर्वलोकांस॥ मा झ्यात्यासीमजसीत्याचानविनाशएकएकास॥३०॥ ॥दोहरा॥ ॥व्यापक होसबजीवमेंमोकोंसबेकोय॥कैसेंहूंकितहूंरहेताकोमामेजोय॥३०॥ ॥ओ वी॥ ॥मजसर्वाठायींवोळखे॥मीसर्वत्रत्यासदेखे॥माझेनिमित्येंसुखें॥ मी

त्याचातोमाझापैं ॥ ३० ॥ ॥ अभंग ॥ ॥ मातें सर्वत्रांतजोपाहेअर्जुना ॥ ज
१४ गाचीभावनानदिसेजया ॥ १ ॥ मजआंतविश्वघेतूंहाअन्वयो ॥ व्यतिरेकेंसेव्योयोग
चीतो ॥ २ ॥ सोडिनामीमगत्याचात्यासजाल्या ॥ सृष्टिप्रळयगेल्यारसातकीं ॥ ३ ॥ तो
हिमजमगसोडीनासहसा ॥ तुकाह्मणेकेंसाराामचिहा ॥ ४ ॥ ३० ॥ ॥ श्लोक ॥
॥ सर्वभूतस्थितंयोमांभजत्येकत्वमास्थितः ॥ सर्वथावर्तमानो ३
पिसयोगीमयिवर्तते ॥ ३१ ॥ ॥ सम० ॥ ॥ सर्वभूतस्थत्यामातेंभजेंध
रूनियेकता ॥ मजमध्येंचतोयोगीप्रपंचींजरिसर्वथा ॥ ३१ ॥ ॥ आर्या ॥ ॥ स
र्वभूतींमजजोएकत्वेंभजतपरमउद्योगी ॥ आसोनीविश्वांतहि माझाठायींअसे
चिसद्योगी ॥ ३१ ॥ ॥ दोहरा ॥ ॥ सबबिखेंस्थितजुहोयइकलखेभजेजु
मोहि ॥ रहेकोनभांतिवहमोंमेबरततजोई ॥ ३१ ॥ ॥ ओवी ॥ ॥ सर्वभू
तींजोआत्मत्वेंभजत ॥ तोसर्वथासंसारींनाहींवर्तत ॥ मजवेगळेंनाहींहोइजेत ॥ तो
चिमींअसें ॥ ३१ ॥ ॥ अभंग ॥ ॥ सर्वभूतस्थात्यामातेंजाणोनियां ॥ भजे ५४
येकत्वींयाभावधरीं ॥ १ ॥ मजमध्येंचितोयोगियाजाणपां ॥ तेजगर्भींआपावस्तीजे

सी॥२॥जरीतोप्रपंचींसर्वथागुंतला॥तरिमुक्तत्वालाकायवाणूं॥३॥तुकाह्मणेब्र
ह्मलोकींचेरहिवासी॥आकेयाधरेसीसाकारलें॥४॥३१॥ ॥श्लोक॥ ॥आ
त्मौपम्येनसर्वत्रसमंपश्यतियोर्ज्जुन॥सुखंवायदिवादुःखंसयोगीपरमो
मतः॥३२॥ ॥सम०॥ ॥सर्वभूतींसमदृष्टीतेंजोपाहेसमअर्जुना॥सुख
दुःखासहीयोगीतोथोरमजसंमत॥३२॥ ॥आर्या॥ ॥स्वानुभवेंसुखदुः
खींज्याचीसर्वत्रदृष्टिसामान्य॥परमश्रेष्ठमहात्मापार्थायोगीनतोकसामान्य॥३२॥
॥दोहरा॥ ॥सबकोंदेखेआपसमसुखदुःखएकेभाय॥सोजोगीस
बतेंबडोमोमेंरहेसमाय॥३२॥ ॥ओवी॥ ॥आपलेंसुखदुःखसर्वत्र
॥जेदेखतीजीवमात्र॥तेयोगीपरमपवित्र॥तेथोरममसंमत॥३२॥ ॥अ
भंग॥ ॥समदृष्टीसर्वभूतें॥जोकांपाहेमद्रूपातें॥१॥मजसमानजाणिजे॥
योगीअर्ज्जुनावंदीजे॥२॥देहिंसुखदुःखलागे॥त्याचानिखरनपावेगें॥३॥दे
वह्मणेमाझाबोलें॥श्रेष्ठतुकयाकळलें॥४॥३२॥ ॥श्लोक॥ ॥अर्ज्जु
नउवाच॥ ॥योऽयंयोगस्त्वयाप्रोक्तःसाम्येनमधुसूदन॥एतस्याहं

१५

नपश्याम्यहं चंचलत्वात्स्थितिं स्थिराम्॥ ३३॥ ॥सम०॥ ॥जो योग

हा बोलिलासी साम्यें श्लोकचतुष्टयें॥ त्याच्या स्थिती तें स्थिर मी न देखें मधुसूदना

॥३३॥ ॥आर्या॥ ॥जो योग तुवां कथिला साम्यें जेणें घडे सदा स्थरती॥ प

रि त्या चंचलतेस्तव त्याची न दिसे मला स्थिती स्थिरती॥ ३३॥ ॥दोहरा॥ ॥जो

ग कह्यो तुम हम जु मो कों येक समान॥ रहे न मों चित्त चंचल हि जो तुम कियो बखान॥

३३॥ ॥ओवी॥ ॥पार्थ ह्मणे योग सांगीतला॥ देवा नाहीं तो म्यां पाहिला॥ चं

चळ मन याला॥ निग्रह केविं घडे॥ ३३॥ ॥अभंग॥ करां जळी जोडोनियां

॥ अर्जुन पुसे कृष्णराया॥ १॥ आतां योग बोलीलासी॥ साम्यें श्लोकचतुष्टयासी॥ २॥

स्थिर मी याच्या स्थिती॥ न देखें हे कोण गती॥ ३॥ सांग मातें मधुसूदना॥ तुका ह्मणे जग

जीवना॥ ४॥ ३३॥ ॥श्लोक॥ ॥चंचलं हि मनः कृष्ण प्रमाथि बलवद्दृढ

म्॥ तस्याहं निग्रहं मन्ये वायोरिव सुदुष्करम्॥ ३४॥ ॥सम०॥

॥ कीं कृष्णा चंचल मन इंद्रियें जें मथीं बळीं॥ त्यांचा निग्रह वाऱ्याची मोट जैसी न बांध १५

वे॥ ३४॥ ॥आर्या॥ ॥चंचळ हें मन कृष्णा प्रमाथि दृढ सबळ विषयसुष्क

रसें॥ वंचीत्याचेंभासेसाधारणवायुसमानदुष्करसें॥ ३४॥ ॥दोहरा॥
मनहैचंचलकृष्णजूबद्गुन्नोकदृढजान॥ ताकोंरोकेंपवनसमहैअतिकठिनसुजान
॥३४॥ ॥ओवी॥ ॥मनचंचलबद्कृष्णा॥ इंद्रियांहूनबळकटगहन॥वायु
चेपरिजायघेवोन॥त्याचानिग्रहदुष्करअसे॥३४॥ ॥अभंग॥ ॥मनहें
चिकृष्णादेवा॥चंचळवागवीस्वभावा॥१॥इंद्रियांतबळोत्तर॥ब्रह्महराअगोचर॥
२॥याचानिग्रहवायुची॥मोटबांधुशक्तिकेंची॥३॥तुकायेनोकाकुली॥येवढी
वारावीफजिती॥४॥३४॥ ॥श्लोक॥ ॥श्रीभगवानुवाच॥ ॥असं
शयंमहाबाहोमनोदुर्निग्रहंचलम्॥अभ्यासेनतुकौंतयवैराग्येणचगृ
ह्यते॥३५॥ ॥सम०॥ ॥खरेंचहेमहाबाहोमनचंचलदुर्जय॥अभ्यासें
आणिवैराग्येंतन्हीतेंजिंकिजेतसें॥३५॥ ॥आर्या॥ ॥चंचलधरवेनाजें
निःसंशयमनबहूततापडतें॥पार्थअभ्यासानेंवैराग्यानेंपरंतुसांपडतें॥३५
॥ ॥दोहरा॥ ॥अर्जुनउत्तमसाचकहिमनचंचलनगहाय॥जोगकियो
वैराग्यसोंनीकेंपकरोजाय॥३५॥ ॥ओवी॥ ॥खरेंचिसांगतोंअर्जुना

१६ ॥ मनचंचळआवरेना॥ अभ्यासेवैराग्येंजाणा॥ जिंकिलेंजातें॥ ३५॥ ॥अ
भंग॥ ॥हास्यमुखेंदैत्यध्वंस॥वदेखरेंचप्रश्नास॥१॥तुचाकेलेंधनुर्धरा॥मह
बाहोपार्थवीरा॥२॥मनचंचलदुर्जय॥आहेमजलाप्रत्यय॥३॥तरिअभ्यासवैरा
ग्यें॥मनवळिजेसंतसंगें॥४॥जिंकिजेलजेव्हांमन॥तुकातेव्हांसमाधान॥५॥३५
॥ ॥श्लोक॥ ॥असंयतात्मनोयोगोदुष्प्रापइतिमेमतिः॥वश्य
त्मनातुयततानाशक्योऽवाप्तुमुपायतः॥३६॥ ॥सम०॥ ॥माझीहे
बुद्धिकींयोगनव्हेजोंमननावरे॥प्रयत्नशीलेंस्ववशें तोपावोंसकिजेमनें॥३६॥
॥आर्या॥ ॥वाटेममतिलाजोअजितात्मायासियोगदुष्प्राप॥वश्या
त्मायत्नकरीपावायाशक्यत्यासिनिष्पाप॥३६॥ ॥दोहरा॥ ॥जिनपकन्यो
नचित्तनिजतापेंजोगनहोय॥जिनअपनोमनबसकियोलहतजननसोई॥३६॥
॥ओवी॥ ॥ज्याचेंअंतःकरणस्थिरनाहीं॥तोदुःखेंकरूनियोगासिनप
वेकहीं॥ज्यासआत्मावश्यजाहलापाहीं॥तोउपावयोगासिपावेसत्य॥३६॥ १६
॥अभंग॥ ॥हेचिबुद्धिकिरे॥योगनोहेसाकारें॥१॥मननाटोपेजंववरी

॥ योगसिद्धीनत्यावरी ॥ २ ॥ ह्मणोनप्रयत्नशीलानें ॥ यत्नयकीजेयासाधनें ॥ ३ ॥ यत्नशिळपुढेंकिती ॥ मगयादुर्मनाचीख्याती ॥ ४ ॥ वृथाभयइंद्रियांचें ॥ तुकयाबाळाबागुलाचें ॥ ५ ॥ ३६ ॥ ॥ **श्लोक** ॥ ॥ **अर्जुनउवाच** ॥ ॥ **अयतिःश्रद्धयोपेतोयोगाच्चलितमानसः ॥ अप्राप्ययोगसंसिद्धिंकांगतिंकृष्णगच्छति** ॥ ३७ ॥ ॥ **सम०** ॥ ॥ निष्ठाअसोनिअळसीमनयोगांतुनीचळे ॥ नमोक्षपावतांकृष्णजायकोणेगतिप्रति ॥ ३७ ॥ ॥ **आर्या** ॥ ॥ शिथिलश्रद्धाअसतांज्याचेंयोगांतुनीहिमनचळतें ॥ पाउनियोगासिद्धिसकोणगतीत्यासहेंनमजकळतें ॥ ३७ ॥ ॥ **दोहरा** ॥ ॥ अजतिऔरश्रद्धासहितजोगभ्रष्टतापाय ॥ लहेनसिद्धीजोगकीकोनगतहिकोजाय ॥ ३७ ॥ ॥ **ओवी** ॥ ॥ पार्थह्मणेकृष्णनाथा ॥ भक्तियुक्तहोऊनिप्रयत्नकरितां ॥ योगीचळूनिसिद्धीनपावतां ॥ कोणगतीपावे ॥ ३७ ॥ ॥ **अभंग** ॥ ॥ अर्जुनपुन्हाविनवितो ॥ एकऐकेंहशब्दतो ॥ १ ॥ निष्ठाअसोनीअळसें ॥ नाहिकेलापूर्णाभ्यास ॥ २ ॥ पुढेंसाधनींबेसतां ॥ गेलेंआयुष्यअनंता ॥ ३ ॥ चळेमनदोहींपक्षीं ॥ नातोप्रपंचकमळाक्षी

॥४॥ कृष्णा त्यासी गती कोण॥ सांगे तुकाह्मणे खुण॥५॥ ॥श्लोक॥ ॥क
च्चिन्नोभयविभ्रष्टश्छिन्नाभ्रमिव नश्यति॥ अप्रतिष्ठो महाबाहो विमूढो
ब्रह्मणः पथि॥३८॥ ॥सम०॥ ॥तो काय उभयभ्रष्ट मेघाचें जें विथी
गळ॥ अपक्क पावला मोह ब्रह्ममार्गी महाभुजा॥३८॥ ॥आर्या॥ ॥जे अ
प्रतिष्ठ कृष्णा ब्रह्मपथा माजि मूढ न समाय॥ होउनि उभयभ्रष्ट छिन्नाभ्रापरि वि
रे न कीं काय॥३८॥ ॥दोहरा॥ ॥की धो दुहन व भ्रष्ट है बादर सों बिनसा
य॥ ताकों कलुन श्वास रोर है मूढ के भाय॥३८॥ ॥ओवी॥ ॥मूढपणें न
पावतां॥ उभयभ्रष्ट तो तत्वतां॥ याची गती विचारितां॥ नासे जैसें अभ्र दिसे वि
तळे॥३८॥ ॥अभंग॥ ॥तो काय उभयभ्रष्ट॥ मेघ थिगळ पैं नष्ट॥१॥
अपक्कें मोह पावे॥ ब्रह्ममार्गी नित्या पावे॥२॥ महाभुज देवराजा॥ मतें आमुचे
या काजा॥३॥ तुकाह्मणे हें चभय॥ वाटे साधकां निश्चय॥४॥३८॥ ॥श्लो
क॥ ॥एतन्मे संशयं कृष्ण छेत्तुमर्हस्यशेषतः॥ त्वदन्यः संशयस्यास्य
छेत्ता न ह्युपपद्यते॥३९॥ ॥सम०॥ ॥निःशेष या संशयातें कृष्णा

छेदिसिएकतूं॥यासंशयाचासंहर्तानदिसेतुजवांचुनी॥३९॥ ॥आर्या॥ ॥यामाझ्यासंदेहाकृष्णातूंचीसमर्थवाराया॥तुजवीणसंशयाचाछेत्ताकोणीनयाद्‌वाराया॥३९॥ ॥दोहरा॥ ॥मेरेयासंदेहकोंदूरिकरोजगदीस॥मेटेयासंदेहकोंकोनकरेनवरीस॥३९॥ ॥ओवी॥ ॥पार्थह्मणेकृष्णा॥हासंशयोछेदेना॥तुजवांचूनिदीनजना॥नदिसेसंशयपरिहरता॥३९॥ ॥अभंग॥ ॥निःशेषयासंशयासी॥उरोंनेदीहेविवसी॥१॥तूंएकछेदिसीश्रीकृष्णा॥आहेभरवसासहिष्णा॥२॥संहर्तायासंशयाचा॥ऐसाप्रतापकोणाचा॥३॥गुरुनदिसेतुजविण॥तुकावाहेआपुलीआण॥४॥३९॥ ॥श्लोक॥ ॥श्रीभगवानुवाच॥ ॥पार्थनैवेहनामुत्रविनाशस्तस्यविद्यते॥नहिकल्याणकृत्कश्चिद्दुर्गतिंतातगच्छति॥४०॥ ॥सम०॥ ॥पार्थानयेथेंनस्वर्गींत्याचानाशघडेकधीं॥कल्याणमार्गींयाकोण्हींबापाजायनदुर्गती॥४०॥ ॥आर्या॥ ॥इहलोकींपरलोकींनाशनयाचाकधींनसेबापा॥सत्कृताचारेंकोणीदुर्गतिनपवेतसाचि

संतापा ॥ ४० ॥ ॥ दोहरा ॥ ॥ अर्जुनदोउँलोकमेंताकोंहोयननास ॥ भले
१८ करमजोकरतहैताकोंनहिअधवास ॥ ४० ॥ ॥ ओवी ॥ ॥ देवह्मणेयोगा
भ्यासीनाहीं ॥ ऐसेंकोणासिघडलेंनाहीं ॥ मोक्षमार्गींचालतांकाहीं ॥ दुर्गतीनजाय ॥
४० ॥ ॥ अभंग ॥ ॥ हर्षेंबोलेभगवान ॥ वायांनजायसाधन ॥ १ ॥ येथेंअथ
वास्वर्गांत ॥ बाधात्यासीअपीडित ॥ २ ॥ मार्गकल्याणदायक ॥ कोणीदीननव्हेलो
क ॥ ३ ॥ बापानजायदुर्गती ॥ तुकाह्मणेयाचीगती ॥ ४ ॥ ४० ॥ ॥ श्लोक ॥
प्राप्यपुण्यकृतांल्लोकानुषित्वाशाश्वतीः समाः ॥ शुचीनांश्रीमतांगेहे योग
भ्रष्टोऽभिजायते ॥ ४१ ॥ ॥ सम० ॥ ॥ पावोनिपुण्यलोकांतेंवर्षेंउमप
राहुनी ॥ शुचीश्रीमंतसदनींतोयोगभ्रष्टजन्मतो ॥ ४१ ॥ ॥ आर्या ॥ ॥ जे
पुण्यवंतत्याच्यालोकींचिरकाळभोगुनीइष्ट ॥ अथश्रीमंताच्यासदनींघेजन्मयोग
विभ्रष्ट ॥ ४१ ॥ ॥ दोहरा ॥ ॥ पुण्यवंतलोकलहेरहेबहुतदिनजाय ॥ जोग
भ्रष्टधनवंतशुचीतिनघरजनमेजाय ॥ ४१ ॥ ॥ ओवी ॥ ॥ पुण्यश्लोकस्व १८
र्गवासी ॥ वर्षेंबहूतस्वर्गासी ॥ ओवटींश्रीमंताचेकुशीं ॥ जन्मघेणें ॥ ४१ ॥

 

॥अभंग॥ ॥पुण्यलोकातेंपाउनी॥ राहेअमृतसेऊनी॥१॥ हर्षेंभोगकल्प वरी॥ त्याचिसत्तास्फुरांवरी॥२॥ मगइच्छूफिरलिया॥ पाबेमृत्युलोकींयेया॥३॥शु चिश्रीमंतघरांत॥योगभ्रष्टतुकाम्हणत॥४॥४१॥ ॥श्लोक॥ ॥अथवायो गिनामेवकुलेभवतिधीमताम्॥एतद्धिदुर्लभतरंलोकेजन्मयदीदृशम्॥ ४२॥ ॥सम०॥ ॥योगियांचेंचअथवाकुळींहोतोंभल्याचियां॥हाजन्मदु र्लभबहुयालोकींजोअसेरिती॥४२॥ ॥आर्या॥ ॥अथवामतिमंता च्यायोग्याच्याजन्मघेकुलींतसीं॥ऐसेंअतिदुर्लभहेंयालोकींजन्मजाणसद्बुद्धी॥ ४२॥ ॥दोहरा॥ ॥बुद्धिवंतजोगीकुलनआनलेयअवतार॥जनमलह तऐसोधरुनदुर्लभहैनिर्धार॥४२॥ ॥ओवी॥ ॥योगियांचेकुळींजन्मोन ॥आपुल्यापुण्येंकरून॥लोकींदुर्लभहोउन॥यालोकींहेरिती॥४२॥ ॥अभं ग॥ ॥किंवायोगीयांचेपोटीं॥योगभ्रष्टपावेहटी॥१॥अथवाभलेकुळींलो क॥तेथेंहोयप्रकाशक॥२॥जन्मदुर्लभईशाना॥ऐसालोभत्यासज्जना॥३॥मा तापिताउभयपक्षी॥तुकावदेदेवसाक्षी॥४॥४२॥ ॥श्लोक॥ ॥तत्र

१९

तंबुद्धिसंयोगंलभतेपौर्वदेहिकं॥यततेचततोभूयः संसिद्धौकुरुनंदन ॥४३॥ ॥सम०॥ ॥त्यादेहींपूर्वदेहींचाबुद्धिसंयोगपावतो॥मोक्षीमगबहूयत्नकरितोकुरुनंदना॥४३॥ ॥आर्या॥ ॥तेथेंजन्मांतरिचापावे संयोगयोगबुध्धीचा॥योगीतोकौंतेयापुनरपिकरितोप्रयत्नसिध्धीचा॥४३॥ ॥दोहरा॥ ॥तीनहोपहिलीदेहकोंलहतबुद्धिसंजोग॥जतनकरतहैसिध्धकोंबहूबीधसोंजोग॥४३॥ ॥ओवी॥ ॥तयांजन्मींपूर्वदेहबुध्धी॥तोमोक्षप्रयत्नकरीबोधीं॥ज्ञानाध्यासबळेंसिध्धी॥साधीहेकुरुनंदना॥४३॥ ॥अभंग॥ ॥यादेहींपूर्वाभ्यासा॥निजमानसापावेल॥१॥पावेबुध्धीचासंयोग॥पुन्हायोगआरंभी॥२॥मगमोक्षबहूयत्नें॥वेचीरत्नेंमतीचीं॥३॥कुरुनंदनासायास॥तुकाबहूसस्वीकारी॥४॥४३॥ ॥श्लोक॥ ॥पूर्वाभ्यासेनतेनैवह्रियतेह्यवशोऽपिसः॥जिज्ञासुरपियोगस्यशब्दब्रह्मातिवर्तते॥४४॥ ॥सम०॥ ॥त्यालानसूर्वअभ्यासबळेंयोगींचयोजितो॥पूर्वीतोयोगजिज्ञासुनहींवेदांअतिक्रमी॥४४॥ ॥आर्या॥ १९

त्यापूर्वीभ्यासबळेंपरवशतोयोगमार्गुनामांडी॥जाणोंइच्छीयोगचिशब्दब्रह्मा
सितोचिबोलांडी॥४४॥ ॥दोहरा॥ ॥सोतोअपनेबसनहिंहैपहिलोअ
भ्यास॥तातेंउपजेजोगजोब्रह्मशब्दमेबास॥४४॥ ॥ओवी॥ ॥पूर्वीअभ्य
साचाधडा॥ह्मणोनियोगस्मरलापुढां॥योगाचाविचारगाढा॥वेदांतें अतिक्रमी
॥४४॥ ॥अभंग॥ ॥अभ्यासतोत्यालापूर्व॥बाळसर्वपावतो॥१॥बाळ
योजीचित्तजोडे॥म्हांनीउडेमाईक॥२॥ जिज्ञासूवेदागमा॥शब्दब्रह्मा मिळा
ला॥३॥नपडेधनदारपालवीं॥तुकयाचवीलागल्या॥४॥४४॥ ॥श्लोक
॥ ॥प्रयत्नाद्यतमानस्तुयोगीसंशुद्धकिल्बिषः॥अनेकजन्मसं
सिद्धस्ततोयातिपरांगतिंम्॥४५॥ ॥सम०॥ ॥प्रयत्नेंसाधि
तांयोगजातेकिल्बिषवासना॥अनेकजन्मींजोसिद्धयाजन्मींमुक्तिपावतो॥४५
॥ ॥आर्या॥ ॥यत्नेंयोगकरीतोहोतोनिष्पापत्याउपरमगती॥बहु
जन्मेंसिद्धालायोग्यालाहोयजाणपरमगती॥४५॥ ॥दोहरा॥
॥जोगीजोजतनकरेडारेसबअघधोय॥बहुजनमसिथिलहेताहिपरमगतिहो

य॥४५॥ ॥ओवी॥ ॥ज्ञानप्रयत्नकरी॥पापदोषहोतीदुरी॥मग
जन्मांतरीं॥मुक्तितेंपावे॥४५॥ ॥अभंग॥ ॥योगसाधितांप्रयत्नें
॥अलभ्यरत्नहातीये॥१॥जयावासनापातकी॥कायानिकीप्रक्षाळी॥२॥
अनेकजन्मेक्रियमाणा॥मुक्तीराणावरीतो॥३॥तुकाह्मणेहितदिसे॥तरि
अनायासेंऐकावें॥४॥४५॥ ॥श्लोक॥ ॥तपस्विभ्योधिकोयो
गीज्ञानिभ्योऽपिमतोऽधिकः॥कर्मिभ्यश्चाधिकोयोगीतस्माद्योगीभवा
र्जुन॥४६॥ ॥सम०॥ ॥तापसाहूनिहीथोरसंमतज्ञानियांहुनी॥
कर्मयोग्यांहुनीतस्मात्‌योगीतूंहोयअर्जुना॥४६॥ ॥आर्या॥ ॥अधिक
तपस्व्यांहुनिहीयोगीज्ञान्यांहुनीमहाबाहो॥आणिअधिककर्मींहुनियास्तवहो
योगितूंमहाबाहो॥४६॥ ॥दोहरा॥ ॥तापसितेंजोगीअधिकग्यानी
हुतेंमान॥करमनहुतेंअधिकजोगीजोगीव्हेतूंमान॥४६॥ ॥ओवी॥
॥तपस्वियाहूनिअधिक॥ज्ञानअसेएक॥ज्ञानाहूनिकर्मआइक॥योगी २०
होयतूं॥४६॥ ॥अभंग॥ ॥तपाहूनीथोर॥योगेश्वरवंदिजे॥१॥

माझामनेंझणेहरी॥ ज्ञान्यानिरींहादिसे॥ २॥कर्मयोगाहुनीश्रेष्ठ॥होननिष्ठत स्मात्तूं॥३॥योगीहोयतूंअर्जुना॥मागेदानतुकया॥४॥४६॥ ॥श्लोक॥ ॥योगिनामपिसर्वेषांमद्गतेनांतरात्मना॥श्रद्धावान्भजतेयोमांसमेयुक्ततमोमतः॥४७॥ ॥सम०॥ ॥स्वरूपनिष्ठचित्तेंजोयांसर्वांयोगियांमध्यें॥भक्तियोगेंभजेमातेंतोयोगीथोरसंमत॥४७॥ ॥आर्या॥ ॥सर्वांयोग्यांमध्येंमातेंमद्गतमनेंहरीनितम॥श्रद्धावंतभजेजोतोभजअतिमान्यजाणयुक्ततम॥४७॥

॥दोहरा॥ ॥जोगीराखेमननहिंमोमेनिश्चळभाय॥श्रद्धावंतमोकोंभजेसोंसबनेंअधिकाय॥४७॥ ॥ओवी॥ ॥योगेश्वरामाझारी॥अंतःकरणठेवीनिर्धारी॥तोभक्तअवधारीं॥तोयोगीमजमानला॥४७॥ ॥अभंग॥

॥स्वरूपींनिष्टचित्तेंजोकां॥लोकलोकांमाझारी॥१॥यासर्वयोगीयांत॥मजमानततोसांगूं॥२॥भक्तियोगेंमातेंभजे॥जोविराजेप्रेमळ॥३॥ योगीथोरवंदावातो॥तुकादेतोअभय॥४॥४७॥ ॥इतिश्रीमद्भगवद्गीतायांयोगशास्त्रेश्रीकृष्णार्जुनसंवादेअभ्यासयोगोनामषष्ठोऽध्यायः॥६॥ ॥ श्लोकवाम

मे॥ ॥इतिटीकासमश्लोकीषष्टाध्यायात्मदीपिका॥श्रीपार्थसारथीकर्त्ताजो
२१ समममर्मीरथी॥६॥ ॥इतिगीतार्थबोधिन्यांश्रीमद्भगवद्गीताटीकायां
षष्ठोऽध्यायः॥६॥ ॥श्रीकृष्णार्पणमस्तु॥ ॥छ॥ ॥छ॥ ॥छ॥

श्रीगणेशायनमः ॥ ॥ वामन ॥ ॥ योगियांतहिसर्वांतजोभजेभक्तिनेम
ला ॥ तोथोरषष्ठाध्यायांतींभगवान्‌बोलिलास्वयें ॥१॥ योगीहोऊनियांकेसाभक्तहें
अर्जुनाप्रति ॥ सांगतोंसप्तमाध्यायींप्रसंगेंज्ञानभक्तिही ॥२॥ ॥ श्लोक ॥ ॥
श्रीभगवानुवाच ॥ ॥ मय्यासक्तमनाःपार्थयोगंयुंजन्मदाश्रयः ॥ अ
संशयंसमग्रंमांयथाज्ञास्यसितच्छृणु ॥ १ ॥ ॥ सम० ॥ ॥ सप्रेममनम
द्रूपींयोगाभ्यासींमदाश्रित ॥ सर्वत्वेंजाणसीमातेंजसेंतेंस्पष्टआइक ॥ १॥ ॥
आर्या ॥ ॥ माझीआसक्तिमनींमदाश्रयेंयोगकरुनिनिर्वाण ॥ निश्चितस
मग्रमातेंजाणसितेंऐकसांगतोंजाण ॥ १॥ ॥ दोहरा ॥ ॥ मेरोहिकरआस
रोमोहिसोंचित्तराख ॥ जांतनिःसंदेहसबमोतेंक्रनभमभाव ॥ १ ॥ ॥ ओवी ॥
अर्जुनाअवधारी ॥ मनमाझेठायींठेवोनियोगकरी ॥ तुझेसंशयनासतील्जया
परी ॥ तेंसांगेनआतां ॥१॥ ॥ अभंग ॥ ॥ द्वारकानाथबोले ॥ पार्थाऐकिलें
पाहिजे ॥१॥ सप्रेममनमद्रूपीं ॥ जोनिक्षेपीभावाळु ॥ २ ॥ मदाश्रितयोगाभ्यासी ॥
अहर्निशीअखंड ॥ ३ ॥ सर्वज्ञत्वेंजाणमातें ॥ स्फुटऐकतोतुकया ॥ ४॥ १॥

श्लोक ॥ ॥ ज्ञानंतेहंसविज्ञानमिदंवक्ष्याम्यशेषतः ॥ यत्ज्ञात्वानेहभूयोऽन्यज्ज्ञातव्यमवशिष्यते ॥ २ ॥ सम० ॥ विज्ञानेसितुतेंज्ञानहेंमीनिःशेषसांगतों ॥ जेंजाणोनिपुन्हायेथेंजाणणेंतेंउरेचिना ॥ २ ॥ आ० ॥ विज्ञानज्ञानतुळाकथितोंसाकल्यवदतिजेशिष्ट ॥ ज्यानेंजाणोनि पुन्हाजाणायाचेंहिनुरविअवशिष्ट २ ॥ दोह० ॥ ग्यानऔरविज्ञानसोंतोसोंकहतबखान ॥ जाकेजानेजान वोकछुनरहतहैजान ॥ २ ॥ ॥ ओवी ॥ ॥ ज्ञानविज्ञानसहित ॥ तुजसांगेनसमस्त ॥ जेंजाणितलियानिश्चित ॥ जाणणेंनउरे ॥ २ ॥ ॥ अभंग ॥ विज्ञानेंसींतुतेंज्ञान ॥ मीसंपूर्णसांगतों ॥ जेंजाणोनिपुन्हायेथें ॥ जाणणेंनेंनुरेची ॥ २ ॥ ऐसीनवलीकबोली ॥ तुकाचालीनिवेदी ॥ ३ ॥ २ ॥ ॥ श्लोक ॥ मनुष्याणांसहस्रेषुकश्चिद्यततिसिद्धये ॥ यततामपिसिद्धानांकश्चिन्मांवेत्तितत्त्वतः ॥ ३ ॥ सम० ॥ ॥ मनुष्यांच्यासहस्रांतमोक्षयत्नींनरक्कचित ॥ यत्नेंहिसिद्धजेत्यांतजाणेंतत्त्वअसाक्कचित ॥ ३ ॥ ॥ आर्या ॥ ॥ मनुज्यांचाहिसहस्रींविरळाकरियत्नसिद्धिचासत्वें ॥ यत्नहिकर्त्यासिद्धामाजीविरळाचिजाणतोतत्वें ॥ ३ ॥ ॥

